**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मऔधो २०१९/प्र.क्र.६/उद्योग-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ मार्च, २०१९

संदर्भ :- शासन निर्णय क्र. मऔधो-२०१७/प्र.क्र. २२९/उद्योग-२, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८

प्रस्तावना:-

महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१३ चा कालावधी ३१/०३/२०१८ पर्यंत असल्यामुळे त्यास नवीन औद्योगिक धोरण अस्तित्वात येईपर्यंत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. नवीन औद्योगिक धोरण जाहीर करण्यापूर्वी राज्यातील विविध औद्योगिक संघटना, उद्योगाचे प्रतिनिधी, उद्योजक व लोकप्रतिनिधी यांचे समवेत विभागीय स्तरावर बैठका घेवून त्यांचेशी विचारविनिमय करुन उद्योग घटकांना येणाऱ्या अडी-अडचणी जाणून घेवून शासन स्तरावर नवीन औद्योगिक धोरणाचा मसुदा तयार करण्यात आला होता. या धोरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्याचा समतोल औद्योगिक विकास घडविण्यासाठी व त्याव्दारे आर्थिक विकास साधण्यासाठी आणि नवीन उद्योग घटकांच्या स्थापनेस चालना देण्यासाठी व रोजगाराच्या भरीव संधी निर्माण होण्यासाठी राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २७ फेब्रुवारी, २०१९ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार "महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१९" हे या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात येत आहे. सदर धोरणाची मराठी व इंग्रजी प्रत या शासन निर्णयासोबत संलग्न असून त्यातील खालील बाबींना विवक्षितपणे प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

**२. राज्याच्या औद्योगिक धोरणाचा दृष्टीकोन, मिशन आणि उद्दिष्टे.**

महाराष्ट्र शाश्वत विकासास चालना देणारे एक जागतिक गुंतवणूक, उत्पादन व तांत्रिक केंद्र.

**मिशन :-**

२०२५ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था एक ट्रिलियन युएस डॉलर पर्यंत वाढविण्याकरीता उत्पादन निर्मिती वातावरणात वृध्दी करण्यासाठी, व्यवसाय करण्यासाठी सुलभता निर्माण करुन त्याद्वारे जागतिक उत्पादक आणि गुंतवणूकदारांसाठी सर्वाधिक पसंतीचे ठिकाण म्हणून विकसित करणे व सर्वाधिक रोजगार निर्मिती करुन त्याद्वारे संतुलित प्रादेशिक आणि सर्वसमावेशक प्रगती साध्य करणे.

**धोरणाची उद्दिष्टे :-** राज्याच्या औद्योगिक धोरण-२०१९ ची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे आहेत :-

- व्यवसायास पोषक वातावरण निर्माण करुन औद्योगिक गुंतवणूकीतील आघाडीचे स्थान अबाधित ठेवणे.
- सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना प्रोत्साहन देऊन रोजगार निर्मितीची उच्च पातळी कायम ठेवणे.

- ❖ प्रादेशिकदृष्टया संतुलित, पर्यावरण दृष्टया शाश्वत व सर्वसमावेशक औद्योगिक वाढीस प्रोत्साहन देणे.

**लक्षांक**

- ❖ सन २०२३ - २४ पर्यंत राज्याच्या सकल उत्पन्नात "उत्पादन" क्षेत्राचा हिस्सा २५% पर्यंत आणण्याचे उद्दिष्ट गाठण्यासाठी " उत्पादन क्षेत्राच्या वाढीचा दर १२ ते १३ टक्के पर्यंत राखणे.
- ❖ रु.१० लाख कोटी एवढया मुल्याची गुंतवणूक आकर्षित करणे.
- ❖ सन २०२३-२४ पर्यंत ४० लाख लोकांसाठी रोजगारांच्या संधी निर्माण करणे.

**३. सुविकसित औद्योगिक पायाभूत सुविधा निर्माण करणे.**

औद्योगिक पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ समर्पित यंत्रणा म्हणून कार्यरत राहील. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे जमिनीच्या उपलब्धतेनुसार व पायाभूत सुविधा देण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यरत राहील.

३.१.१ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (म.औ.वि.म) मुख्यत्वे त्यांच्या अस्तित्वात असलेल्या औद्योगिक वसाहतीमध्ये आवश्यक तेथे विद्यमान पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी कटिबध्द असेल. नवीन औद्योगिक वसाहतीमध्ये जागतिक दर्जाच्या पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरीता देखिल म.औ.वि. महामंडळ कटिबध्द असेल. तसेच भविष्याची गरज ओळखून सुनियोजित औद्योगिक क्षेत्रांत देखिल म.औ.वि. महामंडळ पायाभूत सुविधा विकसित करेल. उदा. समृद्धी महामार्गामधील २० औद्योगिक नोड्स, डीएमआयसी आणि विविध केंद्रीय / राज्य सरकारी औद्योगिक कॉरिडॉर प्रकल्प.

३.१.२ उद्योगांच्या गरजेनुसार नवीन औद्योगिक वसाहती (बहु-क्षेत्र आणि क्षेत्र निहाय) नियोजित आणि विकसित केल्या जातील. यासाठी, पुढील ५ ते १० वर्षात राज्यभर व्यवस्थित आणि प्रादेशिकरित्या संतुलित औद्योगिक विकासास चालना देण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ एक यथार्थदर्शी आराखडा (Perspective Plan) तयार करेल. या भागात हरित औद्योगिकीकरणास उत्तेजन देण्यासाठी आवश्यक उपाययोजना केल्या जातील.

३.१.३ चौथी औद्योगिक क्रांती म्हणून संबोधलेल्या भविष्यातील उद्योग ४.० आणि उच्च तांत्रिक जसे की एअर टॅक्सी, ड्रोन, ड्रायव्हरलेस वाहने, इत्यादी यांच्या गरजा विचारात घेऊन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाद्वारे आवश्यक औद्योगिक पायाभूत सुविधांचे नियोजन करण्यात येईल.

३.१.४ राज्यात मोठया प्रमाणावर जमीन उपलब्ध असून देखील राज्यात रु. १० लाख कोटींच्या गुंतवणूकीस चालना देण्यासाठी उद्योगाकरीता आवश्यक जमीन उपलब्ध करुन देणे गरजेचे आहे. ही गरज विचारात घेऊन, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ मागणीचे मुल्यमापन करुन राज्यभरात जमीन अधिकोष निर्माण करेल.

३.१.५ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे क्षेत्र वगळून राज्यातील १० एकर पेक्षा जास्त सलग क्षेत्र असलेल्या विविध औद्योगिक घटकांच्या विकासासाठी अथवा १० एकर पेक्षा जास्त क्षेत्र असलेल्या औद्योगिक जमिनीच्या तुकड्याच्या विकसनासाठी एकाकी विकासकास तसेच भारत सरकार व राज्य

शासनाच्या योजनांच्या अंतर्गत मंजूर औद्योगिक समुहांसाठी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास (म.औ.वि.मं) विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित केले जाईल. म.औ.वि. महामंडळ व्यवसाय सुलभीकरणासाठी केवळ परवानगी देईल तथापि अशा कोणत्याही क्षेत्रातील पायाभूत सुविधा म.औ.वि. महामंडळ कडून प्रदान केल्या जाणार नाहीत.

३.१.६ राज्यातील वेअरहाऊसिंग व लॉजिस्टिक सुविधांच्या विकासासाठी एमआयडीसी किमान ५०० एकर औद्योगिक क्षेत्र आरक्षित करुन ठेवेल.

३.१.७ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रांच्या धर्तीवर, सर्व सहकारी औद्योगिक वसाहतींमध्ये मुलभूत चटई क्षेत्र निर्देशांकाच्या वर ५० टक्के अतिरिक्त चटई क्षेत्र अनुज्ञेय राहील. त्यासाठी म.औ.वि. महामंडळाने राज्य सरकारची मंजूरी घेऊन निश्चित केलेल्या दराप्रमाणे प्रीमियम आकारला जाईल.

३.१.८ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ औद्योगिक वसाहतींमध्ये सार्वजनिक आरोग्य सुविधांसाठी राखीव ठेवलेली जमीन संबंधित विभागांद्वारे विकसित केली जाईल. विशेषत: राज्य कामगार विमा मंडळाद्वारे हॉस्पीटलची (ESIC) सुविधा संबंधित औद्योगिक संघटनांच्या मागण्या व आवश्यकतेनुसार सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत पुरविण्यात येईल.

३.१.९ राज्य सरकारच्या संबंधित धोरणांनुसार संबंधित क्षेत्रांसाठी अनुज्ञेय असलेल्या अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक मर्यादेत (माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा, जैव तंत्रज्ञान, गारमेंटिंग, जेम्स ॲण्ड ज्वेलरी, लॉजिस्टिक्स ॲण्ड वेअरहाऊसिंग) जमीन वापराची अदलाबदल राज्य सरकारच्या परवानगीने आवश्यकतेनुसार मंजूर केली जाईल.

३.१.१० सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे फ्लॅटेड गाळयाची निर्मिती करेल.

### ३.२. विशेष प्रकल्पांचा लाभ घेणे:-

केंद्र / राज्य शासनाने विशेष प्रकल्प म्हणून घोषित केलेल्या महाराष्ट्र समृध्दी महामार्ग, दिल्ली मुंबई औद्योगिक मार्गिका, सागरमाला, भारतमाला इत्यादी महत्वपूर्ण प्रकल्पांच्या मार्गावर औद्योगिक वसाहती उभारण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा उद्योग विभाग प्रोत्साहन देईल. म.औ.वि.महामंडळ हे केंद्र /राज्य शासनाच्या विशेष प्रकल्पांच्या मार्गावरील औद्योगिक नोडस् विकसित करण्यासाठी “नोडल एजन्सी” म्हणून काम करेल.

अ) महाराष्ट्र समृध्दी महामार्ग

आ) दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर (डीएमआयसी)

इ) सागरमाला आणि तटीय आर्थिक क्षेत्रे (कोस्टल इकॉनॉमिक झोन्स-सीईझेड)

### ३.३ निर्णायक औद्योगिक पायाभूत सुविधा निधी :-

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रा बाहेरील औद्योगिक क्षेत्रामध्ये महत्त्वाच्या पायाभूत सुविधा जसे की अंतिम टप्प्याची रस्तेजोडणी, समर्पित विद्युतवाहिनी, पाणीपुरवठा इत्यादी मूलभूत सुविधांसाठी संबंधितांकडून निधीची प्रचंड मागणी आहे. अश्या निधीची आवश्यकता आणि

त्याचा दृश्यमान प्रभाव लक्षात घेता, मागील धोरणा दरम्यान तयार करण्यात आलेला निर्णायक औद्योगिक पायाभूत सुविधा निधी (क्रिटिकल इंडस्ट्रियल इन्फ्रास्ट्रक्चर फंड -सीआयआयएफ) मध्ये वाढ करुन या धोरणाच्या कालावधीत रु.१००० कोटी इतक्या वाढीव संचितासह (corpus) चालू राहील. या निधीचा वापर, अंतिम टप्प्यापर्यंतच्या पायाभूत सुविधांची जोडणी देण्यासाठी आणि विद्युत जाळे, सांडपाणी प्रक्रिया संच, रस्ते इत्यादीसारख्या औद्योगिक पायाभूत सुविधांच्या निर्मिती आणि उन्नतीसाठी केला जाईल. औद्योगिक समूह आणि विविध औद्योगिक उद्यानांच्या पायाभूत सुविधांसाठी आणि पायाभूत सुविधांसाठी मागील धोरणात नमूद केल्याप्रमाणे मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती सदर निधीची मंजूरी व व्यवस्थापन करेल. राज्य शासन कार्यक्रमावरील खर्चाअंतर्गत धोरण कालावधीत अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे टप्प्याटप्प्याने निधी उपलब्ध करुन देईल.

**३.४ खाजगी औद्योगिक मुलभूत सुविधा विकासासाठी चालना देणे.**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे औद्योगिक क्षेत्रामध्ये अपूरी जमीन असल्यामुळे, बऱ्याच भागात अनियोजित औद्योगिक विकास झाला आहे. याचे सुसूत्रीकरण करण्यासाठी आणि स्थानिक उद्योजकता प्रोत्साहित करण्यासाठी, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांवर लक्ष केंद्रित असलेल्या खाजगी औद्योगिक वसाहतीच्या विकासासाठी खाजगी गुंतवणूक आकर्षित करण्याचा राज्याचा उद्देश राहील.

३.४.१ औद्योगिक पायाभूत सुविधांच्या विकासासाठी खाजगी क्षेत्रातील सहभागास प्रोत्साहन देण्याकरिता, या धोरणामध्ये निश्चित केलेल्या प्राधान्य क्षेत्रांशी (Thrust sector) संबंधित औद्योगिक उद्याने स्थापन करण्यासाठी प्रकल्पांना सहाय्य करण्यात येईल.

३.४.२ महिला / अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती उद्योजकांकडून सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योजकांसाठी विकसित केलेल्या औद्योगिक वसाहतींना प्राधान्य दिले जाईल आणि जास्तीचे १००% आर्थिक सहाय्य दिले जाईल. त्यासाठीचा निधी सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विकास विभाग यांचेकडून उपलब्ध करुन घेण्यात येईल.

३.४.३ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे या खाजगी औद्योगिक वसाहतींसाठी नियोजन प्राधिकरण असेल.

**४. प्राधान्य क्षेत्रांना (Thrust Sectors) प्रोत्साहित करणे.**

उदयोन्मुख उच्च तंत्रज्ञानाच्या क्षेत्रांकडे औद्योगिक विकास वळविण्यासाठी व रोजगार निर्माण करण्यासाठी राज्य शासनाने खालील क्षेत्रांना प्राधान्य दिले आहे. थ्रस्ट सेक्टर मधील प्रकल्पांना जागावाटपामध्ये प्राधान्य दिले जाईल व त्यांना विशेष प्रोत्साहने देखील देण्यात येतील.

i. विद्युत वाहने (उत्पादन, पायाभूत सुविधा व देखभाल)
ii. हवाई व संरक्षण उत्पादन उद्योग
iii. उद्योग ४.० (कृत्रिम बुध्दीमत्ता, त्रिमिती छपाई, महाजाल, यंत्रमानव विज्ञान, अतिसूक्ष्म तंत्रज्ञान इत्यादी.)

iv. एकात्मिक डेटा सेंटर पार्कस (IDCP)

v. वस्त्रोद्योग यंत्रसामुग्रीचे उत्पादन

vi. जैव तंत्रज्ञान, वैद्यकीय निदान उपकरणे

vii. कृषी व अन्न प्रक्रिया उद्योग (फक्त द्वितीय व तृतीय अन्न प्रक्रिया उद्योग)

viii. माहिती तंत्रज्ञान (IT) व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा (ITeS)

ix. इलेक्ट्रॉनिक प्रणाली संरचना व उत्पादन (ESDM) व सेमीकंडक्टर फॅब्रिकेशन (FAB)

x. लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग

xi. हरित ऊर्जा / जैवइंधनाचे उत्पादन

xii. क्रिडा व व्यायामशाळा उपकरण उत्पादन

xiii.अणुऊर्जा प्रकल्पांच्या उपकरणांचे उत्पादन

xiii.खनिज व वन आधारीत उद्योग

❖ राज्याच्या औद्योगिकीकरणास हातभार लावणारे कोणते उद्योग आगामी काळात येतील व कोणत्या उद्योगाच्या क्षेत्रास अभिनव/नाविन्यपूर्ण (niche segment /sunrise sector) असा दर्जा देवून त्यांना थ्रस्ट सेक्टर म्हणून संबोधावे यासाठी व अशा सेक्टरचा समावेश करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीस अधिकार राहतील.

## ५. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम तसेच छोट्या उद्योगांना प्रोत्साहन

सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम हे राज्याच्या अर्थव्यवस्थेचा कणा आहेत. महाराष्ट्रात ३ दशलक्षाहून अधिक सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम असून त्याची संख्या देशामध्ये सर्वाधिक आहे. देशामध्ये महाराष्ट्रात सर्वात जास्त सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम असून एकूण रोजगाराच्या ८० टक्क्यांहून अधिक योगदान देतात. स्थानिक साधनसंपत्तीचा वापर करण्यासाठी आणि स्थानिक उद्योजकता व रोजगाराची निर्मिती करण्यासाठी सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम हे सर्वोत्तम माध्यम आहे. सुमारे ४०% निर्यात सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांपासून होते. त्यामुळे सदर उपक्रमांना औद्योगिक विकास व रोजगार निर्मितीसाठी विशेषत: लहान औद्योगिक घटकांसाठी प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने स्थिर भांडवली गुंतवणूकीची (एफसीआय) गुंतवणूकीची मर्यादा ५० कोटी रुपयांपर्यंत वाढविण्यात आली आहे. सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना प्रोत्साहने देण्यासाठी सोबत जोडलेल्या धोरणातील खालील उपाययोजनांना विविक्षीतपणे मान्यता देण्यात येत आहे.

### I. संभाव्य सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे जिल्हानिहाय निर्धारण :-

सूक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांच्या उत्पादन संभाव्यतेचा अभ्यास करुन व्यूहरचना निर्धारीत करुन त्याची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासन महाराष्ट्रातील सर्व जिल्हयांमध्ये सर्वेक्षण करुन Geographical Indication (भौगोलिक मापदंड) आधारीत अभ्यास करणार आहे. भौगोलिक मापदंडावर आधारीत उत्पादने ही केवळ आपल्या समृध्द परंपरेचा वारसा नसून ग्रामीण कारागीर यंत्रमाग, शेतकरी अथवा लघु कारागीरांच्या उत्तम कौशल्याचा व बुध्दीमत्तेचा नमुना आहे. अश्या समृध्द परंपरेस जपणे व त्यांना औद्योगिक धोरणात स्थान देणे हे केवळ आपले कर्तव्य नसून मेक इन

इंडियाचा भाग राहील. सदर कामगिरी महाराष्ट्र राज्य लघु उद्योग महामंडळाकडे (एमएसएसआयडीसी) सोपविण्यात येईल.

**II. नवीन फ्लॅगशिप योजनेचा शुभारंभ - मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना (CMEGP)**

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना (CMEGP) बेरोजगार युवकांसाठी सुरु करणार असून बँकेकडून सहज व सोप्या पध्दतीने अर्थसहाय्य देऊन स्थानिक युवकांना स्वयंरोजगाराकडे प्रेरित करणे हे नवीन योजनेचे उद्दिष्ट आहे. सदर योजना उत्पादन व सेवा क्षेत्रातील सर्व घटकांना लागू राहणार आहे. सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा उद्योग विभाग हे शीर्षस्थ अभिकरण संस्था असेल. सदर योजनेंतर्गत १८ ते ४५ वयातील पात्र व्यक्तींना प्रशिक्षित करुन स्वयंरोजगारासाठी प्रोत्साहित करण्यात येणार आहे व त्यासाठीचे समभाग भांडवल बॅकएंड अनुदानात परिवर्तित करण्यात येईल जे राज्य शासन बँक कर्जाच्या अनुसार देईल. प्रकल्प खर्च उत्पादन क्षेत्रासाठी रु. ५० लाख व सेवा / व्यवसाय क्षेत्रासाठी रु.१० लाख एवढा मर्यादित असेल. सदर योजनेची अंमलबजावणी उद्योग संचालनालय तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत करण्यात येणार आहे. राज्य शासन यासाठी कार्यक्रमावरील खर्चामधून अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे वित्तीय सहाय्य करण्यात येईल. आवश्यकतेनुसार विशेष घटक योजना (SCP ) अथवा आदिवासी उपाययोजना (TSP) मधून निधी उपलब्ध केला जाईल. कार्यक्रमाची मुख्य वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत:-

अ. स्वयंरोजगारासाठी प्रोत्साहन - धोरण कालावधीत किमान १,००,००० सूक्ष्म उपक्रम.

ब. रोजगाराच्या संधी निर्माण करणे - धोरण कालावधीत किमान १० लाख.

क. युवकांसाठी उद्योजकता विकास कार्यक्रम - धोरण कालावधीत २,००,००० युवक.

ड. अनुदान योजनेद्वारे आर्थिक सहाय्य - मंजूर प्रकल्प खर्चाच्या १५% ते ३५%.

इ. योजनेमध्ये उत्पादन आणि व्यवसाय / सेवा क्षेत्र समाविष्ट आहे.

फ. ग्रामीण आणि निमशहरी अर्थव्यवस्थेला प्रोत्साहन.

**III. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना संस्थात्मक पाठबळ :-**

सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना तंत्रज्ञानाचा स्वीकार व प्रसार, बाजारपेठ विश्लेषण, प्रशिक्षण इत्यांदीसह अनेक बांबीमध्ये सुधारणा होण्याकरीता सूक्ष्म व मध्यम उद्योगांना संस्थाना राज्य शासन महाराष्ट्रातील विद्यमान संबंधित संस्थाचे बळकटीकरण करण्यास मदत करेल. सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे “सेंटर ऑफ एक्सलन्स” (सीओई), प्रशिक्षण सुविधा, कार्यशाळा आयोजित करुन संस्थात्मक सहकार्य करणे व जागतिक दर्जाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांचे राज्यातील सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांमध्ये परस्पर सहकार्य/ सामंज्यासाठी राज्य शासन पुढाकार घेईल.

**IV. औद्योगिक समूह प्रवर्तन (क्लस्टर प्रमोशन) :-**

औद्योगिक समूह प्रवर्तन विकासामध्ये सुधारणा करण्यासाठी समुह आधारीत प्रोत्साहनासाठी सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे खालीलप्रमाणे उपाय योजना केल्या आहेत :-

- ❖ अ, व ब क्षेत्र वगळून राज्यांमधील मंजूर सामायिक सुविधा केंद्रांकरिता आर्थिक प्रोत्साहने राज्य शासनाकडून दिली जातील.
- ❖ समूह विकासासाठी वित्तीय सहाय्याची मर्यादा विद्यमान ५ कोटी रुपयांवरून १० कोटी रुपयांपर्यंत वाढविली जाईल.
- ❖ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या नविन औद्योगिक वसाहतींमध्ये २० टक्के क्षेत्रफळ हे, सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी आरक्षित ठेवण्यात येईल. त्यापैकी २० टक्के क्षेत्रफळ हे अनुसूचित जाती / जमाती मधील उद्योजक व ५ टक्के क्षेत्रफळ महिला उद्योजिका व महिला बचत गटांच्या औद्योगिक घटकांसाठी राखीव ठेवण्यात येईल. माजी सैनिकाच्या पुर्नवसनाच्या दृष्टीने त्यांना स्वयंरोजगाराच्या संधी मिळाव्यात यासाठी २ टक्के क्षेत्रफळ राखीव ठेवण्यात येईल.
- ❖ केंद्र / राज्य सरकारच्या समूह विकास योजनेंतर्गत स्थापित सामायिक सुविधा केंद्र (सीएफसी) औद्योगिक कार्य (इंडस्ट्रियल ॲक्टीव्हीटी) समजले जाईल.

**V. सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना सार्वजनिक निधीची सुविधा उपलब्ध करुन देणे :-**

राज्यातील अनेक सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांमध्ये मोठ्या प्रमाणावर विस्तार करण्याची क्षमता आहे. त्यामुळे सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमासाठी आता स्टॉक एक्स्चेंजवर लिस्टींगद्वारे सार्वजनिक निधी प्राप्त करू शकतात. राज्य सरकारने धोरण कालावधी दरम्यान एसएमई एक्सचेंज, मुंबईमध्ये सूचीबद्ध होणाऱ्या महाराष्ट्रातील पहिल्या २५० एसएमईंना आर्थिक सहाय्य प्रदान करून सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पाठिंबा देण्यात येईल.

**VI. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांची नादारी व कर्जबाजारीच्या समस्यांमधून सोडवणूक करण्यासाठी सल्लागार कक्ष :-**

सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांच्या नादारी व कर्जबाजारीच्या समस्यांवर त्वरित तोडगा काढण्यासाठी व संबंधित घटकांना मार्गदर्शन करण्यासाठी नादारी व दिवाळखोरी संहिता २०१६ अंतर्गत महाराष्ट्र शासन प्रादेशिक विभागवार कक्ष स्थापन करेल. सदर उद्देशार्थ महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाला बळकट व सक्षम करुन त्यादृष्टीने अधिकार बहाल करण्यात येतील.

**६. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना आर्थिक प्रोत्साहने**

केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम अधिनियम-२००६ मधील व्याख्येनुसार तसेच ज्या लहान उद्योग घटकांची स्थिर भांडवली गुंतवणूक रु.५० कोटी पर्यंत आहे अशा सूक्ष्म, लघु, व मध्यम उपक्रमांना सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत एकत्रित आर्थिक सवलती देण्यास शासन मान्यता देण्यात येत असून अशा सर्व प्रोत्साहनांची एकूण मर्यादा ही खालील तक्त्यातील तसेच सोबतच्या धोरणात नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहील.

**तक्ता क्र.१ - सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी पात्रता निकष**

<table>
<tr><th>तालुका / क्षेत्र वर्गीकरण</th><th>स्थिर भांडवली गुंतवणुकीची कमाल मर्यादा (रु. कोटी)</th><th>स्थिर भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीच्या प्रमाणात मर्यादा</th><th>पात्रता कालावधी (वर्षे)</th></tr>
<tr><td>अ</td><td rowspan="7">या धोरणाच्या अनुषंगाने, सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमाची व्याख्या ही केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम अधिनियम-२००६ मधील व्याख्येनुसार तसेच ज्या लहान उद्योग घटकांची स्थिर भांडवली गुंतवणूक रु.५० कोटी पर्यंत आहे अशी राहील.</td><td>-</td><td>-</td></tr>
<tr><td>ब</td><td>३०%</td><td>७</td></tr>
<tr><td>क</td><td>४०%</td><td>७</td></tr>
<tr><td>ड</td><td>५०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>ड+</td><td>६०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदूर्ग व धुळे</td><td>८०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>विना उद्योग जिल्हे, नक्षलग्रस्त जिल्हे* आणि आकांक्षी जिल्हे (एस्पायरेशनल डिस्ट्रीक्टस) **</td><td>१००%</td><td>१०</td></tr>
<tr><td colspan="4">*महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग.<br>** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (Aspirational Districts).</td></tr>
</table>

**७. मोठ्या, विशाल व अतिविशाल प्रकल्पांमध्ये गुंतवणूक आकर्षित करणे.**

महाराष्ट्र देशात सर्वात जास्त मोठे व विशाल प्रकल्प आहेत. राज्याला मोठया, विशाल व अतिविशाल प्रकल्पांमुळे मोठया प्रमाणावर महसूल आणि रोजगार निर्मितीचा लाभ झालेला आहे त्यामुळे प्रादेशिकरित्या संतुलित व सर्वसमावेशक विकास साधण्याकरीता या धोरणामध्ये एकत्रित प्रयत्न केले आहेत.

**७.१ मोठया उद्योगांना प्राधान्य**

मोठया उद्योगांची व्याख्या ही जे औद्योगिक घटक स्थिर भांडवली गुंतवणूक किंवा प्रत्यक्ष रोजगार यांची किमान मर्यादा खाली नमूद तक्त्याप्रमाणे पार पाडतील त्यांना मोठे उद्योग म्हणून संबांधिले जाईल. मोठ्या उद्योगांना देण्यात येणारे अर्थसहाय्य अशा प्रकारे देण्यात येईल की, जेणेकरुन जास्तीत जास्त उद्योग राज्याच्या अविकसित भागामध्ये स्थापित होतील. सोबतच्या धोरणात नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मोठया उद्योगांना देण्यात येणारी आर्थिक प्रोत्साहने ही त्यांच्या बास्केट ऑफ इन्सेंटिव्हज मधील एकूण रकमेच्या मर्यादेपेक्षा जास्त नसतील.

**तक्ता २ - मोठ्या उद्योगांसाठी पात्रतेचे निकष**

| तालुका / विभाग वर्गवारी | स्थिर भांडवली गुंतवणुकीची किमान मर्यादा (रु. कोटी) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (संख्या) |
|---|---|---|
| अ व ब | ७५० | १००० |
| क | ५०० | ७५० |
| ड | २५० | ५०० |
| ड+ | १५० | ४०० |
| विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, धुळे | १०० | ३०० |
| विना उद्योग जिल्हे, नक्षलग्रस्त जिल्हे* आणि आकांक्षी जिल्हे | १०० | २५० |
| *महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग.<br>** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (एस्पायरेशनल डिस्ट्रीक्टस्). | | |

**टिप** -राज्यातील सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांसाठी असलेल्या रुपये ५० कोटी या स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या कमाल मर्यादेपेक्षा जास्त परंतु वरील तक्ता क्र. २ मध्ये विहित केलेल्या मोठया उद्योगांसाठीच्या किमान गुंतवणूक मर्यादेपर्यंत स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या पात्र उद्योग घटकांना ४० टक्के मर्यादेपर्यंत राज्यातील प्रथम विक्रीवर देय राज्य वस्तू व सेवा करावर (SGST) औद्योगिक विकास अनुदान अनुज्ञेय राहील. मात्र "अ" तसेच "ब" वर्गवारीसाठी ही प्रोत्साहने लागू राहणार नाहीत.

सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार थ्रस्ट सेक्टरमधील मोठ्या उद्योगांना अतिरिक्त प्रोत्साहने व अन्य प्रोत्साहने जसे की, मुद्रांक शुल्क माफी, वीज शुल्क भरणे, भरणा सवलत इत्यादी प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

८. **विशाल व अतिविशाल प्रकल्पांना प्रोत्साहने**

८.१ विशाल प्रकल्पांमुळे मिळणारे बहुविविध फायदे लक्षात घेवून अशा प्रकारची गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी या प्रकल्पांना विवक्षित एकत्रित प्रोत्साहने देण्यात येतील.

८.२ खाली दर्शविलेल्या तक्त्यात नमूद केलेल्या स्थिर भांडवली गुंतवणूक किंवा प्रत्यक्ष रोजगाराच्या मर्यादा पूर्ण करणाऱ्या उद्योगांना विशाल / अतिविशाल प्रकल्प म्हणून संबोधण्यात येईल.

**तक्ता ३ - विशाल व अतिविशाल उद्योगांना सवलतींचे वितरण करण्यासाठी पात्रता निकष**

| उद्योगाचा प्रकार | तालुका / विभाग वर्गवारी | स्थिर भांडवली गुंतवणुकीची किमान मर्यादा (रु. कोटी) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (व्यक्तींची संख्या) |
|---|---|---|---|
| विशाल प्रकल्प | अ व ब | १५०० | २००० |
| | क | १००० | १५०० |
| | ड | ७५० | १००० |
| | ड+ | ५०० | ७५० |
| | विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे | ३५० | ५०० |
| | विना उद्योग जिल्हे, नक्षली प्रभावित विभाग* व आकांक्षी जिल्हे** | २०० | ३५० |
| अतिविशाल प्रकल्प | संपूर्ण राज्यासाठी | ४००० | ४००० |
| *महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग. ** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (Aspirational Districts). | | | |

सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून :-

- ❖ रोजगाराच्या निकषानुसार अतिविशाल/विशाल उद्योगांना अर्हताधारक रोजगारांना संपूर्ण वर्ष आपल्या हजेरीपटावर प्रत्यक्ष रोजगारीत म्हणून ठेवावे लागेल. वर्षाच्या कोणत्याही कालावधीत रोजगाराचा निकष पूर्ण न केल्यास, त्या वर्षासाठी औद्योगिक प्रोत्साहन सहाय्य अनुज्ञेय असणार नाही.

- ❖ शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००५/प्र.क्र.११९/उ-८, दिनांक ०२ जून, २००५ अन्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली उच्चाधिकार समिती ही विशाल व अति विशाल प्रकल्पांना द्यावयाच्या प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना (customized package) मान्यता देईल.

- ❖ शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१०९७/(१३४७८)/उ-८, दिनांक १८ जानेवारी, १९९८ अन्वये स्थापन करण्यात आलेली व शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००४/प्र.क्र.३१८/उ-८, दिनांक २४ डिसेंबर, २००४ अन्वये पुनर्रचित करण्यात आलेली मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील उद्योगांकरिता मंत्रीमंडळ उप समिती विशाल /अतिविशाल प्रकल्पांसाठी प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहने (customized package) देण्यास मंजूरी देईल.

८.३ राज्यातील रु. ५०० कोटीपेक्षा जास्त स्थिर भांडवली गुंतवणुक असलेल्या मोठे, विशाल व अतिविशाल प्रकल्पांमध्ये राज्य शासनाची महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणामार्फत ९% समभाग भागीदारी

असणार आहे. ही भागीदारी महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९ च्या धोरण कालावधीमध्ये सदर प्रकल्पांना मिळालेल्या प्रोत्साहनांच्या बदली स्वरुपात असेल. इक्विटी भागीदारी ही केवळ समभागाच्या स्वरुपात असेल. समभाग व लाभांश हे महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण यांच्या नावाने निर्गमित करण्यात येतील. जर राज्य शासनाला त्यांच्या समभागांची विक्री करावयाची असेल तर केवळ चालू बाजार भावाप्रमाणे त्याची विक्री करण्यात येईल. याविषयी प्रथम नकार देण्याचा अधिकार संबंधित औद्योगिक घटकाच्या प्रवर्तकाचा असेल. ज्यामुळे व्यावसायिक स्पर्धा / ईर्षा / व्यावसायिक विरोधामुळे होणारे अधिग्रहण टळेल.

८.४ राज्य सरकारकडून सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत प्रोत्साहन मिळविणा-या विशाल व अतिविशाल प्रकल्पांना राज्य सरकारद्वारे विहित करण्यात आलेल्या स्थानिक लोकांना रोजगार धोरणा प्रमाणे रोजगार पुरविणे आवश्यक राहील. तसे न केल्यास देऊ केलेल्या प्रोत्साहनांमध्ये घट होईल.

- ❖ राज्यातील सूक्ष्म, लघु, मध्यम, मोठे, विशाल व अतिविशाल उद्योगांना सामूहिक प्रोत्साहन योजनेव्यतिरिक्त राज्य शासनाच्या अन्य विभागाकडून प्रोत्साहने / सवलती दिल्या जातात, (उदा. सूत गिरण्या) उद्योग घटकांस सर्व स्त्रोतामार्फत देण्यात येणारा आर्थिक परतावा / प्रोत्साहने घटकाने केलेल्या एकूण स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या १०० टक्केच्या मर्यादेतच अनुज्ञेय राहील.

### ९. हरित औद्योगिकीकरणास सहाय्य करणे.

महाराष्ट्र हे शाश्वत विकासासाठी पुढाकार घेणारे अग्रगण्य राज्य आहे आणि ते हरित औद्योगिकीकरणास प्रोत्साहन देते, ज्यामुळे पर्यावरणावरील प्रतिकूल प्रभाव कमी होईल.

पात्र उद्योगांना पाणी, ऊर्जा व पर्यावरण यांचे संवर्धन करण्याची प्रक्रिया हाती घेण्यासाठी सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे हरित औद्योगिकीकरण सहाय्य देण्यात येईल.

### १०. संशोधन व विकसनाला प्रोत्साहन देणे (R & D)

संशोधन व विकास हे एखाद्या क्षेत्राची उत्पादकता आणि आर्थिक प्रगती करण्यासाठी महत्त्वपूर्ण आहे. भक्कम संशोधन व विकास पायाभूत सोयी सुविधा ही शाश्वत विकासासाठी थेट योगदान देते आणि वैज्ञानिक समुदायासाठी रोजगाराच्या नव्याने संधी निर्माण करते. ही बाब विचारात घेवून सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे संशोधन व विकसनाला प्रोत्साहन शासनाकडून देण्यात येईल.

### ११. स्टार्टअप्ससाठी वातावरण निर्मितीस चालना देणे:-

नवीन औद्योगिक धोरणांमुळे नाविन्यपूर्ण स्टार्टअप्सना आवश्यक पायाभूत सुविधा प्रदान करून नवउद्योजकांना पूरक वातावरण निर्माण करण्यासाठी धोरणाचा भाग म्हणून राज्य शासन पाठबळ देईल. सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्यानुसार नव उद्योजकांना आर्थिक सहाय्य, समूपदेशन देऊन मदत केली जाईल व त्यांच्या कल्पनांचे आदान प्रदान करणेसाठी पुरेशा उपाययोजना केल्या जातील.

### १२. बंद घटकांच्या मालमत्तेचा औद्योगिक प्रयोजनार्थ पुर्नवापर

पुढील ५ वर्षासाठी निर्धारीत केलेल्या रु. १० लाख कोटी गुंतवणुकीच्या लक्ष्याचा विचार करता, त्या गुंतवणूकी प्रत्यक्षात येण्यासाठी राज्यात पुरेशा जमिनीची उपलब्धता आवश्यक आहे. विशेषत: राज्याच्या विकसित भागांमध्ये जमीनीची उपलब्धता दुरापास्त झाली आहे. या बाबींचा विचार करुन शासन उद्योगांना अविकसित भागात गुंतवणूक करण्यासाठी शासन आर्थिक सवलती देणार आहे. त्याशिवाय सोबत

जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे बंद झालेल्या उद्योगांच्या जमिनींचा सुध्दा उपयोग करण्याचे शासनाचे प्रयोजन आहे.

**१२.१ विशेष अभय योजना**

सर्व बंद झालेल्या उद्योगांच्या शासकीय देणी व शास्तींच्यासाठी राज्य शासन विशेष अभय योजना आणणार असून त्यामध्ये (शासकीय अभिकरणे समाविष्ट) शासकीय देण्याच्या मुद्दलाची एक रकमी परतफेड करुन त्यावरील व्याज आणि / किंवा शास्ती पूर्णपणे माफ करण्यात येईल. सदर माफी योजना मर्यादित कालावधीसाठी कार्यान्वित असेल. महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ एक आकर्षक एकरकमी परतफेड योजना (OTS) जाहीर करेल.

**१२.२ बंद पडलेल्या औद्योगिक उपक्रमांच्या जमिनी मुक्त करणेबाबत**

- ❖ गेली ५ वर्षे जे बंद उद्योग असतील आणि ज्यांच्याकडे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रामध्ये २०,००० चौ.मी. एवढी जमीन उपलब्ध असेल अशा घटकांना औद्योगिक समूह उभारण्याची अनुमती असेल.
- ❖ सदर जमिनीचा पुर्नवापर होण्यासाठी विशेष पुढाकार घेण्यात येईल. औद्योगिक जमिनीचा वापर हा ६०:४० या प्रमाणात असेल म्हणजेच ६० टक्के औद्योगिक व ४० टक्के पूरक सेवा हे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रात अनुज्ञेय राहील.
- ❖ सदर जागेचा विकास होण्याच्या उद्दिष्टाने नॉन फिसकल प्रोत्साहने दिल्याशिवाय विकासक पुढे येणार नाही. सबब अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक किती द्यावा, तसेच आकारणी करावयाचे अधिमूल्य, यासह अन्य बाबींसंदर्भात निकष तयार करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली ४ सदस्यांची समिती नेमण्यात येत आहे. यामध्ये सचिव (नवि-१), सचिव (वित्त/व्यय), विकास आयुक्त (उद्योग) व मुख्य कार्यकारी अधिकारी (म.औ. वि. म.) यांचा समावेश असेल.
- ❖ पुर्नविकसन प्रकल्प हे ७ वर्षांच्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे.

**१३. वॉक टू वर्क संकल्पना**

- ❖ “वॉक टू वर्क” संकल्पनेला चालना देऊन शहरातील गर्दी कमी करण्यासाठी, राज्यात सॅटेलाईट कार्यालयांना विकसित केले जाईल. कामाच्या ठिकाणापासून ५ किमी परिसरामध्ये कर्मचाऱ्यांसाठी निवासी सुविधा विकसित करण्यासाठी उद्योगांना प्रोत्साहीत केले जाईल.
- ❖ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ अशा क्षेत्रांसाठी नियोजन प्राधिकरण असेल आणि इतर सरकारी यंत्रणा विकासासाठी सहभागी होतील. सदर जागेचा विकास होण्याच्या उद्दिष्टाने नॉन फिसकल प्रोत्साहने दिल्याशिवाय विकासक पुढे येणार नाही. सबब अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक किती द्यावा, तसेच आकारणी करावयाचे अधिमूल्य, यासह अन्य बाबींसंदर्भात निकष तयार करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली ४ सदस्यांची समिती नेमण्यात येत आहे. यामध्ये सचिव (नवि-१), सचिव (वित्त/व्यय), विकास आयुक्त (उद्योग) व मुख्य कार्यकारी अधिकारी (म.औ. वि. म.) यांचा समावेश असेल.
- ❖ निवासी क्षेत्रात, चित्रपटगृहे, सार्वजनिक सभागृह आणि मल्टीप्लेक्स, रुग्णालये, नर्सिंग होम, शाळा आणि महाविद्यालये, प्रशिक्षण संस्था आणि त्यांच्याशी संबंधित वसतिगृहे यासारख्या व्यावसायिक

प्रयोजनांना परवानगी दिली जाईल. केवळ प्रदूषण रहीत उद्योगांना व सेवा क्षेत्रास परवानगी दिली जाईल.

**१४. राज्यात व्यवसाय सुलभता आणणे आणि महाराष्ट्र उद्योग, व्यापार व गुंतवणूक कक्ष (मैत्री) सबलीकरण करणे**

व्यवसाय सुलभ करण्यासाठी मैत्री हा राज्य सरकारचे एक पाऊल आहे. सुरुवातीपासूनच असंख्य उपक्रमांना मंजुरी / परवानग्या / परवाना मंजूर करण्यात ते खूप प्रभावी ठरले आहे. मैत्रीने सरकारची भूमिका नियमन कर्त्याकडून (रेग्युलेटर) सुकर कर्त्याची (फॅसिलिटेटर) म्हणून बदलली आहे. व्यवसाय, व्यापार आणि वाणिज्य क्षेत्रात नवीन संधी विचारात घेता उद्योग, व्यापार आणि वाणिज्य क्षेत्रास प्रोत्साहन देण्यासाठी सरकारने घेतलेल्या पुढाकारांच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता मैत्रीला स्वायत्त दर्जा देण्यात येणार आहे. यासह सोबतच्या धोरणात नमूद बाबींना विविक्षितपणे मान्यता देण्यात आली आहे.

- ❖ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रामध्ये महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कराच्या प्रयोजनासाठी आंतरमाध्यम (इंटरफेस) म्हणून काम करेल.
- ❖ राज्याच्या सेवा अधिनियम कायद्यांतर्गत मैत्री कक्षाला अपिलीय अधिकार देण्यात येतील. तसेच मैत्री कक्षाच्या प्रभावी कामकाजासाठी स्वतंत्र कायदा करुन अधिकार प्रदान केले जातील.

**१५. व्यापार व वाणिज्यासाठी पुढाकार**

व्यापार व वाणिज्य क्षेत्रास प्रोत्साहन देण्याकरीता उद्योग विभागांतर्गत एक स्वतंत्र कक्ष / कार्यासन तयार केले जाईल तसेच त्याच्या अंमलबजावणीस सहाय्य करण्यासाठी उद्योग संचालनालयामध्ये स्वतंत्र कक्षाची निर्मिती करण्यास शासन मान्यता देत आहे.

**१६ जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषदेची स्थापना**

जागतिक गुंतवणूकदारांनी गुंतवणूक करण्यास दाखविलेल्या स्वारस्याचा लाभ घेण्यासाठी राज्य शासन मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषदेची स्थापना करेल. राज्यात विविध क्षेत्रांमध्ये गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी ही परिषद जगभरातील उद्योजकांचे मजबूत जाळे तयार करेल. भविष्यात परिषद युनायटेड स्टेट्स, यूरोप, आशिया, मध्य पूर्व आणि आफ्रिका इत्यादी देशांबरोबर द्विपक्षीय संबंध स्थापित करेल. सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्यानुसार या परिषदेकडून विविध उपक्रम राबविण्यात येतील.

**१७ निर्यात प्रचालन पुढाकार**

निर्यात व्यूहरचना आखण्याकरीता एक अभ्यास अहवाल तयार करण्यात आलेला असून त्यामध्ये वस्त्रे, अभियांत्रिकी वस्तू, कृषी उत्पादन आणि प्रक्रियाकृत खाद्य पदार्थ, आयटी / आयटीईएस, ऑटो व ऑटोचे सुटे भाग आणि औषधे आणि रसायने ही प्रमुख क्षेत्रे निर्यात वाढीसाठी अधोरेखित करण्यात आलेली आहेत. तसेच निर्यात प्रचालनासाठी मा.मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली निर्यात प्रचालन परिषदेची

स्थापना करण्यात येणार आहे. या संदर्भात सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्याप्रमाणे परिषदेची प्रमुख कार्य राहतील.

**१७.१ निर्यात पायाभूत सुविधा पाठबळ**

सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्यानुसार प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्र अंतिम टप्प्यापर्यंत जोडणी, चाचणी व गुणवत्ता प्रमाणन प्रयोगशाळा उभारणीसाठी राज्य शासनाकडून सहाय्य करण्यात येईल.

**१७.२ साहस भांडवल निधी (व्हेंचर कॅपिटल फंड)**

राज्य साहस भांडवलासाठी सिडबीला निधी उपलब्ध करुन देईल व सदर निधी निर्यातक्षम घटकांना (ईओयू) व्यवहार्यता-तफावत-निधी (व्हायबिलिटी गॅप फंडिंग) म्हणून देण्यात येईल.

**१८ विशेष पुढाकार**

प्रादेशिकदृष्ट्या संतुलित आणि सर्वसमावेशक वाढीचा विचार दृष्टीसमोर ठेऊन शासनाने राज्यात गुंतवणूक आणि रोजगार वाढविण्यासाठी खालील प्रमाणे विशेष पुढाकार सुनिश्चित केले आहेत.

**१८.१ महाराष्ट्राच्या अविकसित जिल्ह्यांमध्ये उद्योगांसाठी विशेष प्रोत्साहने**

औद्योगिक विकासात क्षेत्रीय असमानता दूर करण्यासाठी खालील क्षेत्रांना धोरणांतर्गत अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात येतील.

१. विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि धुळे,
२. विना उद्योग जिल्हे,
३. नक्षलग्रस्त क्षेत्र (महाराष्ट्र शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने जारी केलेल्या १ एप्रिल २०१३ रोजीचा शासन निर्णय क्रमांक: पीएसआय -२०१३ / (सीआर - ५४) /उद्योग-८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे)
४. आकांक्षी जिल्हे (उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार).

या जिल्ह्यात सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ अंतर्गत सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम, मोठ्या व विशाल प्रकल्पांना गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी आणि रोजगार निर्माण करण्यासाठी अतिरिक्त वित्तीय प्रोत्साहने व प्रोत्साहने उपभोगण्यासाठी अधिकचा कालावधी दिला जाईल.

रोजगारावर आधारित मोठ्या आणि विशाल प्रकल्पांसाठी, रोजगार निर्मितीसाठीची किमान मर्यादा इतर भागांपेक्षा कमी असेल.

**१८.२ कृषी व अन्न प्रक्रिया, हरित ऊर्जा / बायो-इंधन आणि उद्योग ४.० मधील उद्योगांसाठी विशेष प्रोत्साहने**

कृषी व अन्न प्रक्रिया (द्वितीय व तृतीय प्रक्रिया करणारे घटक आणि उत्पादन आणि प्रक्रिया करणाऱ्या शेतकरी उत्पादक कंपन्या), हरीत ऊर्जा / जैविक इंधन आणि उद्योग ४.० मधील पात्र औद्योगिक उद्योगांना २०% अतिरिक्त आर्थिक प्रोत्साहने देण्यात येतील आणि दोन वर्ष अतिरिक्त पात्रता कालावधी अनुज्ञेय असेल . तसेच शेतकऱ्यांच्या उत्पादन करणाऱ्या कंपन्यांना देखील वरील प्रमाणे सवलत अनुज्ञेय असेल.

### १८.३ अनुसूचित जाती-जमाती व महिला उद्योजकांसाठी विशेष प्रोत्साहने

अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती व महिला उद्योजकांसाठी विकसित केलेल्या अथवा त्यांनी विकसित केलेल्या औद्योगिक वसाहतींना प्राधान्य व अतिरिक्त आर्थिक सहाय्य देण्यात येईल.

नवीन म.औ.वि.म. क्षेत्रांमध्ये, २०% क्षेत्र सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी प्रथम प्राधान्याने जमीन वाटप करण्यात येईल. तसेच २०% क्षेत्र अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती व नव बौध्द उद्योजकांसाठी आणि ५% क्षेत्र महिला उद्योजक आणि महिला बचत गटांच्या औद्योगिक घटकांसाठी व ५ % क्षेत्र दिव्यांगासाठी प्रथम प्राधान्याने जमीन वाटप करण्यात येईल. प्राधान्याने जमीन वाटपाची मर्यादा कोणत्याही नवीन औद्योगिक क्षेत्रात या संवर्गातील वाटपाची कमाल क्षेत्रीय मर्यादा २५% इतकी असेल या विषयी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जमीन वाटप नियामावलीत आवश्यक बदल करण्यात येतील.

अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीमधील उद्योजकांसाठी आणि महिला उद्योजकांसाठी उबवन केंद्रे (इन्क्युबेटर) स्थापन करणाऱ्या उद्योजकांना अधिकचे आर्थिक सहाय्य दिले जाईल.

### १९. राज्य पातळीवरील उद्योग पुरस्कार

राज्यातील औद्योगिक विकासासाठी उद्योगांच्या अतुलनीय योगदानास प्रोत्साहन देण्यासाठी राज्यातर्फे दरवर्षी अशा उद्योग / व्यवसायिकांना राज्य पातळीवरील उद्योग पुरस्कार देऊन सन्मानित करण्याचे निश्चित केले आहे.

### २०. जिल्हा उद्योग केंद्रांचे सक्षमीकरण करणे.

विविध धोरण आणि योजनांवर व्यापक माहिती देण्यासाठी तसेच जिल्हा व्यापार स्तरावर सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे विपणन, व्यापार आणि वाणिज्य, उद्योजकता विकास आणि आजारी असलेल्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे पुनरुज्जीवन करण्यास पाठबळ देण्यासाठी जिल्हा उद्योग केंद्रांचे (डीआयसी) सक्षमीकरण करण्यात येणार आहे.

### २१. उद्योजकता विकसनासाठी शिखर संस्था

महाराष्ट्रात जागतिक स्तरावरील (स्टेट ऑफ आर्ट) शिखर उद्योजकता विकास संस्था ही मुंबई महानगर क्षेत्रात कळंबोली जि.रायगड येथे महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाच्या जागेवर स्थापन करण्यात येणार आहे. सोबत जोडलेल्या धोरणात नमूद केल्यानुसार त्याची मुख्य वैशिष्टे राहतील.

### २१.१ सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्राची स्थापना

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि महानगरपालिका यासारख्या राज्य / स्थानिक प्राधिकरणांद्वारे प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्रे विकसित केली जात आहेत. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ राज्यातील योग्य ठिकाणी सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्र विकसित करेल. सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्राच्या विकासासाठी राज्य सरकार आवश्यक ते सहाय्य देईल.

**२२. सामाजिक दायित्व निधी (कॉर्पोरेट सोशल रिस्पॉन्सिबिलिटी) (सीएसआर) अंतर्गत कामे.**

समाजाच्या प्रती सद्भावना व्यक्त करण्याचा भाग म्हणून, सामुहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत राज्य सरकारकडून प्रोत्साहन मिळवणारे औद्योगिक घटक त्यांच्या कॉर्पोरेट सोशल रिस्पॉन्सिबिलिटी फंडच्या किमान ५०% रक्कम राज्यामध्ये विकास कामासाठी खर्च करतील.

**२३. क्षेत्र विशिष्ट धोरणे**

- ❖ मागील काही वर्षांमध्ये महाराष्ट्राने क्षेत्र विशिष्ट धोरणे तयार / बदल केली असून त्यांना प्रस्तुत नवीन औद्योगिक धोरणाशी संलग्न करण्यात येईल.
- ❖ राज्य शासनाने राज्याच्या विविध क्षेत्रनिहाय धोरणांतर्गत विशेष तरतुदी केल्या आहेत. ही धोरणे खालीलप्रमाणे आहेत.
    १. रेडिमेड गारमेंट निर्मिती ,जेम्स अँड ज्वेलरी , सूक्ष्म इलेक्ट्रॉनिक्स व अभियांत्रिकी घटक याकरिता फ्लॅटेड गाळायुक्त औद्योगिक संकुले धोरण-२०१८ (शा.नि. दि.१४/०२/२०१८)
    २. फिनटेक धोरण - २०१८ (शा.नि.दि. १६/०२/२०१८)
    ३. महाराष्ट्र काथ्या धोरण § २०१८ (शा.नि. दि.१५/०२/२०१८)
    ४. महाराष्ट्र इलेक्टिकल व्हेईकल प्रोत्साहन धोरण - २०१८ (शा.नि. दि.१४/०२/२०१८)
    ५. महाराष्ट्र लॉजिस्टिक पार्क धोरण - २०१८ (शा.नि. दि.१४/०२/२०१८)
    ६. वस्त्रोद्योग धोरण - २०१८ (शा.नि. दि. १५/०२/२०१८)
    ७. क्लाउड कॉम्प्युटिंग धोरण -२०१८ (शा.नि.दि. २९/०१/२०१८)
    ८. अवकाश आणि संरक्षण क्षेत्र उत्पादन धोरण -२०१८ (शा.नि. दि.१४/०२/२०१८)
    ९. माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण- २०१५ (शा.नि. दि.२५/०८/२०१५)
    १०. महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण- २०१६ (शा.नि. दि.११/०४/२०१६)
    ११. किरकोळ व्यापार धोरण-२०१६ (शा.नि. दि. १०/०२/२०१६)
    १२. एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करताना विकासकांना सोई सवलती-२०१८ (शा.नि.दि. १६/०२/२०१८)
    १३. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर अनुसूचित जाती व जमातीसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना - २०१६ (शा.नि. दि. ११/०२/२०१६)
    १४. महिला उद्योजकांसाठी विशेष धोरण-२०१७ (शा.नि.दि.१४/१२/२०१७)
    १५. टेलीकॉम पायाभूत सुविधा धोरण २०१८ (शा.नि.दि. १७/०२/२०१८)
- ❖ प्रचलित क्षेत्रनिहाय धोरणांमध्ये महाराष्ट्राच्या पूर्वीच्या औद्योगिक धोरणांचा आणि त्याअंतर्गत सवलतींच्या सर्वसामान्य नियमांचा किंवा सामुहिक प्रोत्साहन योजनेतील सवलतींचा संदर्भ आहे. सदर धोरण (महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१९) जाहीर झाल्यावर, अन्यथा विनिर्दिष्ट केलेले असल्याशिवाय, असे संदर्भ हे महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१९ त्यामधील सवलतींच्या सर्वसामान्य नियम किंवा सवलतींना अनुलक्षून असल्याचे मानण्यात येईल.

- ❖ विविध धोरणांतर्गत (जसे की, एकात्मिक औद्योगिक क्षेत्र धोरण, इलेक्ट्रॉनिक्स धोरण इत्यादी) पात्र उद्योगांना लागू असलेली मुद्रांक शुल्क सवलत तशीच सुरु राहील.

**२४. उद्योग विषयक बाबींचे निर्धारण करण्यासंदर्भात मंत्रिमंडळ उपसमिती :-**

सन २०२५ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था १ ट्रिलियन युएस डॉलर पर्यंत नेण्याचे उद्दिष्टपूर्ती करण्यामध्ये "सेवा" क्षेत्राचा हिस्सा लक्षणीय आहे. ही बाब विचारात घेता राज्यशासनाच्या संयुक्त उपक्रमातील जी विशेष आर्थिक क्षेत्रे विना-अधिसूचित झाल्यावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून घोषित होतील अशा औद्योगिक क्षेत्रामध्ये सेवा क्षेत्राचा प्रोत्साहन रहित वापर अनुज्ञेय राहील. ज्या सेवा / प्रकल्प इतर प्रशासकीय विभागाच्या शासकीय धोरणात मंजूर करण्यात आलेल्या आहेत केवळ अश्या सेवा / प्रकल्प या औद्योगिक क्षेत्रात घेता येतील. या व्यतिरिक्त इतर सेवा / प्रकल्पाबाबत शा. नि. क्रमांक आयडीएल-१००४/प्र. क्र. ३१८/उद्योग-८, दिनांक २४/१२/२००४ अन्वये गठीत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमिती निर्णय घेईल.

**२५. धोरणाचे संनियंत्रण व आढावा**

महाराष्ट्र राज्याचे औद्योगिक धोरण-२०१९ चा परिणामकारक आढावा व अंमलबजावणी होण्यासाठी तसेच आवश्यक स्पष्टीकरण /अर्थउकल करण्यासाठी तसेच त्याच्या अंमलबजावणीतील प्रगतीवर नियंत्रण ठेवण्यासाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती कार्यरत असेल. ही समिती नवीन औद्योगिक धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी व अंमलबजावणीवर संनियंत्रण ठेवण्यासाठी एक प्रकल्प संनियंत्रण समिती स्थापन करण्यात येईल. सदर प्रकल्प संनियंत्रण समिती म्हणून कार्यरत राहील.

**२६. धोरणातील फेरबदलासाठी समिती :-**

महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९ काही शंका/ अडचणी/ संदिग्धता निर्माण झाल्यास, अशा शंका/ अडचणी/ संदिग्धते संदर्भात निर्णय घेण्याचे व औद्योगिक धोरणात आवश्यक ते फेरबदल करण्याचे अधिकार शासन निर्णय क्र. आयडीएल-१००४/प्र.क्र.३१८/उद्योग-८, दिनांक २४/१२/२००४ अन्वये गठीत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रिमंडळ उपसमितीस राहतील.

**२७. धोरणाचा कालावधी :**

सदर धोरणाचा कालावधी हा दिनांक १ एप्रिल, २०१९ पासून पुढील पाच वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहील.

या शासन निर्णयानुसार सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी व उद्योग विभागाच्या अधिनस्त कार्यासने / कार्यालयांनी आवश्यक ते आदेश अधिसूचना त्वरीत निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२२८११५१५४९११० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Madhukar Gavai

Digitally signed by Satish Madhukar Gavai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7a352c6e5214e46c7291288d7bdd3da8d4d491fb2abc05db685f030b3c91a86, serialNumber=b32b48825a7f1e378cf9c45a746344cd98a33fcf7ce566dd8f527acfa94563c1, cn=Satish Madhukar Gavai
Date: 2019.03.07 17:17:55 +05'30'

**( सतिश गवई )**

अपर मुख्य सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री(उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (उद्योग), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व) व मा. राज्यमंत्री (सर्व )यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९. अध्यक्ष, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव (महसूल/मुद्रांक), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. प्रधान सचिव (वि.चौ.अ(१) ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२५. प्रधान सचिव (सा.उ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

२६. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

२७. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२८. प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

२९. सचिव, महिला व बालविकास, मंत्रालय, मुंबई.

३०. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.

३१. सचिव, कृषी व फलोत्पादन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३२. विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/नागपूर/नवी मुंबई (कोकण विभाग) / मुंबई.

३३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन,मंत्रालयासमोर, मुंबई.

३४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, उद्योगसारथी, महाकाली केव्हज रोड,अंधेरी (पूर्व), मुंबई.- ४०० ०९३.

३५. महानगरपालिका आयुक्त, महानगर पालिका (सर्व)

३६. संचालक, नगररचना व मूल्यनिर्धारण, पुणे,

३७. व्यवस्थापकीय संचालक, शहर औद्योगिक विकास महामंडळ, निर्मल भवन, नरीमन पॉईन्ट, मुंबई.

३८. जिल्हाधिकारी (सर्व)

३९. उद्योग सह संचालक, उद्योग संचालनालय पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/नागपूर/नवी मुंबई (कोकण विभाग) / मुंबई.

४०. अधिक्षकीय उद्योग अधिकारी, नांदेड उपविभाग, नांदेड.

४१. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व).

४२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या नियंत्रणाखालील महामंडळे / शासकीय उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक, मुख्य कार्यकारी अधिकारी

४३. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.

४४. उद्योग विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

४५. निवड नस्ती (उद्योग-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

# महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९

## १. प्रस्तावना

महाराष्ट्र औद्योगिक विकासामध्ये संपूर्ण भारतात अग्रेसर राज्य आहे. जागतिक स्तराच्या पायाभूत सुविधांसह आकर्षक औद्योगिक धोरणे आणि व्यवसाय करण्याचे सुलभीकरण यामुळे राज्यात अनेक जागतिक ब्रँड्स स्थिरावले आहेत. राज्य उद्योगातील अभूतपूर्व तांत्रिक प्रगतीचा साक्षीदार आहे, त्यामुळे राज्य विविध क्षेत्रात नवीन नाविन्यपूर्ण उपक्रम आणि स्टार्टअप आकर्षित करीत आहे. यात उद्योग ४.० आणि माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा यांचाही समावेश आहे.महाराष्ट्र हे देशातील ऑटोमोबाईल उत्पादनाचे मुख्य केंद्र आहे. कृषी आणि अन्न प्रक्रिया उद्योगांमध्ये देखील राज्य आघाडीवर आहे. राज्यातून सर्वाधिक निर्यात होत असल्यामुळे ते गुंतवणूकदारांचे सर्वाधिक पसंतीचे ठिकाण बनले आहे. देशात प्रमुख सुधारणांची सातत्याने अंमलबजावणी होत असल्यामुळे व स्थिर वाढीस समर्थन मिळाल्याने भारत जगात तिस-या क्रमांकाची अर्थव्यवस्था होत आहे. महाराष्ट्र राज्याचे देशाच्या अर्थव्यवस्थेमध्ये अग्रेसर स्थान व "मॅग्नेटिक महाराष्ट्र" ब्रँड चे बळकटीकरण सोबतच प्रगतीशील प्रतिमा, औद्योगिक वाढ आणि शाश्वत विकासावर लक्ष केंद्रित केल्यामुळे देशाच्या अर्थव्यवस्थेमध्ये प्रमुख योगदान देणारे राज्य आहे.

### १.१ महाराष्ट्राचा परिचय :-

भारताच्या पश्चिम भागात स्थित महाराष्ट्र हे सर्वात जास्त औद्योगिकीकरण झालेले राज्य आहे. रु.२४.९७ लक्ष कोटी (३८७ अब्ज अमेरिकन डॉलर) सकल राज्य उत्पादन (जीएसडीपी) असलेली महाराष्ट्राची अर्थव्यवस्था ही भारतातील सर्वात मोठी अर्थव्यवस्था आहे व सन २०१७-१८ मधील तिचा वाटा भारताच्या एकूण सकल राष्ट्रीय उत्पन्नाच्या (जीडीपी) १५.०१ टक्के होता. महाराष्ट्र राज्याच्या अर्थव्यवस्थेमध्ये उत्पादन, वित्तसेवा, आंतरराष्ट्रीय व्यापार, जनसंपर्क माध्यमे, तंत्रज्ञान, पेट्रोलियम, फॅशन, वस्त्रप्रावरणे, जडजवाहीर व आभूषणे, माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा व पर्यटन उद्योगांचा मोठा वाटा आहे. महाराष्ट्राची राजधानी व देशाची आर्थिक राजधानी असलेल्या मुंबईत अनेक कॉर्पोरेट व वित्तीय संस्थांची मुख्यालये स्थित आहेत. भारताचे मुख्य रोखे बाजार (Stock Exchanges-BSE & NSE) व वायदे बाजार (commodity exchange) तसेच भांडवल बाजार या शहरात आहेत. महाराष्ट्रामध्ये उत्तम संस्थापित औद्योगिक, आर्थिक वातावरण व व्यवहारिक नेतृत्व यामुळे राज्य हे एक अग्रेसर औद्योगिक व आर्थिक केंद्र बनले आहे. राज्याने देशी तसेच प्रख्यात परदेशी गुंतवणूकदारांव्दारे मोठ्या प्रमाणात औद्योगिक गुंतवणूक आकर्षित केली आहे. भारत सरकारच्या औद्योगिक धोरण व प्रोत्साहन विभागानुसार (डीआयपीपी), एप्रिल-२००० ते डिसेंबर-२०१७ या कालावधीत महाराष्ट्रात ११३.८२ अब्ज

अमेरिकी डॉलर इतकी थेट परदेशी गुंतवणूक झाली असून ती देशात झालेल्या एकूण थेट परदेशी गुंतवणूकीच्या सुमारे एक तृतीयांश आहे.

**मॅग्नेटिक महाराष्ट्र : अमर्यादित आकर्षणे**

महाराष्ट्र आपल्या सुविकसित पायाभूत सुविधा, कुशल कामगार, वाहतूकीचे चांगले जाळे, मोक्याचे भौगोलिक स्थान, उद्योगांच्या विविध क्षेत्रांसाठी आखलेली धोरणे , सर्वोत्तम प्रोत्साहन धोरण आणि अशा अनेक बाबींमुळे उद्योगांसाठी देशात सर्वाधिक पसंतीचे स्थान आहे. यामुळे देशांतर्गत आणि भारता बाहेरून सर्वाधिक गुंतवणूक आकर्षित करण्यास महाराष्ट्र सक्षम ठरले आहे आणि ते "मॅग्नेटिक महाराष्ट्र - अमर्यादित आकर्षणे" म्हणून उदयास आले आहे.

१.१.१ **मोक्याचे स्थान :** महाराष्ट्र हे क्षेत्रफळाच्या दृष्टीने देशातील तिसऱ्या क्रमांकाचे व लोकसंख्येच्या दृष्टीने दुसऱ्या क्रमांकाचे मोठे राज्य आहे. राज्याचे क्षेत्र ३,०७,६९० वर्ग किलोमीटर इतके असून सन २०११ च्या जनगणनेनुसार अंदाजित लोकसंख्या ११२.०४ दशलक्ष आहे. राज्याच्या पश्चिमेस अरबी समुद्र असून राज्याला ७२० कि.मी. इतकी विस्तृत किनारपट्टी लाभलेली आहे. सन २०११ च्या जनगणनेनुसार राज्याचे ४५.२ टक्के इतक्या मोठया प्रमाणात नागरीकरण झाले आहे. सर्व महत्वाच्या आर्थिक निकषांनुसार भारतातील हे सर्वात संपन्न राज्य आहे. राज्याची राजधानी असलेले मुंबई हे जगातील एक सर्वात मोठे क्षेत्र असलेले महानगर असून भारतातील सर्वात मोठे व जास्त लोकसंख्येचे शहर आहे, तसेच देशाची आर्थिक राजधानी आहे. भारतामध्ये वस्तू व सेवा कराची अंमलबजावणी सुरु झाल्यानंतर वस्तूंच्या व सेवांच्या मुक्त चलनवलनामुळे तसेच उत्तर आणि दक्षिण भारत जोडणाऱ्या प्रमुख बिझिनेस हब या भौगोलिक स्थानामुळे महाराष्ट्र हे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय बाजारपेठांना नजरेसमोर ठेऊन उत्पादन करण्याकरीता सर्वोत्तम राज्य आहे.

१.१.२ **सुविकसित पायाभूत सुविधा :-** रस्ते, रेल्वे, वायु आणि बंदरे यांच्या जाळयामुळे राज्य मोठ्या औद्योगिक आणि उपभोग केंद्रांशी चांगल्या रितीने जोडलेले आहे.४३००० मेगावॅट वीज निर्मितीची क्षमता असल्यामुळे महाराष्ट्रात उद्योगांना २४ X ७ अखंड वीज पुरवठा होतो. गुंतवणूकदारांना विकसित व अविकसित असे दोन्ही प्रकारचे भूखंड मिळतील अशी व्यवस्था शासनाने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या मार्फत केली आहे.

अ. **रस्त्यांचे जाळे :** राज्यामधून अंदाजे २२००० कि.मी. लांबीचे राष्ट्रीय महामार्ग जातात. महाराष्ट्र समृद्धी महामार्ग - एक सुपर कम्युनिकेशन एक्सप्रेसवे आणि नागपूर व मुंबईला जोडणारा एक औद्योगिक कॉरिडॉर आहे. गुजरातमधील वडोदरा व महाराष्ट्रातील मुंबई यांना जोडणारा ३८० किमी लांब, सहा लेन, नियंत्रित-प्रवेश मुंबई-वडोदरा एक्सप्रेसवे असे भविष्याचा वेध घेणारे एक्सप्रेसवे प्रकल्प महाराष्ट्रामध्ये निर्माणाधीन आहेत.

ब. **रेल्वेचे जाळे :** देशांतर्गत बाजारपेठेसोबत कनेक्टिव्हिटी वाढविणारी दोन प्रमुख रेल्वे झोन राज्यात आहेत. मुंबई मेट्रो, नागपूर मेट्रो आणि पुणे मेट्रो सारख्या मेट्रो प्रकल्पासारखे २३३ कि.मी अंतराइतके देशातील सर्वात मोठे मेट्रो रेल्वेचे जाळे महाराष्ट्रात निर्माणाधीन आहेत.

क. **विमानतळ आणि बंदरे** : महाराष्ट्रात ७ देशांतर्गत विमानतळ आणि ४ आंतरराष्ट्रीय विमानतळ आहेत आणि राज्य सरकार आणखी १० नवीन विमानतळ विकसित करीत आहे. ज्यापैकी शिर्डी, नाशिक, नांदेड, कोल्हापूर आणि जळगाव येथे विमानतळ सध्या कार्यान्वित आहेत आणि रत्नागिरी, गोंदिया, सिंधुदुर्ग आणि अमरावती येथे विमानतळे प्रस्तावित आहेत. राज्यात दोन महत्वाची बंदरे व ५३ छोट्या बंदराद्वारे जगाशी समुद्र मार्गाव्दारे उत्तमरित्या जोडलेले आहे.

१.१.३ **कुशल व उच्चशिक्षित कामगार वर्गाची विपुलता:** - राज्यामध्ये २० विद्यापीठे, २१ अभिमत विद्यापीठे आहेत. राष्ट्रीय दृष्या महत्वाची असे भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी), भारतीय व्यवस्थापन संस्था (आयआयएम), भारतीय फॅशन तंत्रज्ञान संस्था (एनआयएफटी), भारतीय औषध उत्पादनाचे शिक्षण व संशोधन संस्था (एनआयटीईआर), टाटा सामाजिक विज्ञान संस्था (टिआयएसएस), भारतीय बांधकाम व्यवस्थापन संशोधन संस्था (एनआयसीएमएआर), रसायन तंत्रज्ञान संस्था (आयसीटी) इ. दर्जेदार संस्था राज्यात आहेत. राज्यातील ६००० पेक्षा जास्त संस्थांमधून १.६ दशलक्ष विद्यार्थ्यांची दरवर्षी नोंदणी केली जाते.

१.१.४ **सुस्थापित औद्योगिक वातावरण:**- राज्याच्या पूरक औद्योगिक धोरणामुळे अनेक प्रख्यात औद्योगिक घटक राज्यात आले आहेत. महाराष्ट्राच्या आर्थिक सर्वेक्षणानुसार सन २०१७-१८ मध्ये उत्पादन क्षेत्रातील वाढीचा दर हा ७.६ टक्के एवढा अपेक्षित आहे. राज्यामध्ये विविध उद्योगांसाठी अनुकूल वातावरण आहे. उदा. वाहन उद्योग (पुणे व औरंगाबाद विभाग), इलेक्ट्रॉनिक प्रणाली संरेखन उद्योग (पुणे विभाग), औषध उद्योग व रासायनिक उद्योग (मुंबई, ठाणे, औरंगाबाद व पुणे विभाग), अभियांत्रिकी (अहमदनगर, नाशिक, पुणे व औरंगाबाद विभाग), ग्राहकोपयोगी वस्तु (पुणे विभाग), वस्त्रोद्योग (सोलापूर व नागपूर - अमरावती विभाग), अन्नप्रक्रिया (सोलापूर, अहमदनगर-नाशिक, नागपूर-अमरावती विभाग), लॉजिस्टिक्स् (मुंबई-ठाणे विभाग व नागपूर - अमरावती विभाग), सिमेंट आणि स्टील उद्योग (विदर्भ-मराठवाडा विभाग), माहिती तंत्रज्ञान व त्यावर आधारित उद्योग (मुंबई, ठाणे, पुणे व नागपूर अमरावती विभाग) हयांचा या संदर्भात प्रामुख्याने उल्लेख करता येईल. सन २०१४ ते २०१८ या कालावधीमध्ये राज्यात ११९ खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानामधून सुमारे १९२.६० कोटी गुंतवणूक झाली असून त्यातून ५,५०,००० इतकी रोजगार निर्मिती झाली आहे.

१.१.५ **व्यवसाय सुलभीकरण (Ease of Doing Business)** :- महाराष्ट्र उद्योग, व्यापार व गुंतवणूक कक्ष (मैत्री) अंतर्गत समर्पित गुंतवणूकदार सुविधा कक्ष व एक खिडकी योजना संकेत स्थळ निर्माण करण्यात आले आहे. एक खिडकी योजना संकेत स्थळामुळे अर्ज सादर करणे,

शुल्काचे प्रदान करणे तसेच उद्योग संदर्भातील राज्याच्या विविध विभागांकडून मंजुऱ्या यांचा पाठपुरावा व नियंत्रण ठेवण्यासाठी त्यामध्ये तरतूद आहे. मैत्री कक्ष तक्रार निवारण कक्ष म्हणून देखील काम करतो. मैत्री कक्ष जी २ बी सेवा, विद्यमान आणि संभाव्य गुंतवणूकदारांसाठी एकाच ठिकाणी सर्व सेवा प्रदान करते. जागतिक बँकेने केलेल्या डुइंग बिझनेस-२०१९ अहवालानुसार (१९० अर्थव्यवस्थेचे आकलन करुन), २३ स्थानांची जोरदार झेप घेऊन भारत ७७ व्या क्रमांकावर आला आहे. भारत २०१८ च्या अहवालानुसार १०० व्या क्रमांकावर आणि २०१७ च्या अहवालानुसार १३० क्रमांकावर होता. सदरहू क्रमवारी ठरविताना मुंबई आणि दिल्लीच्या शहरांचे मूल्यमापन करण्यात आले आहे (१० दशलक्षापेक्षा जास्त लोकसंख्या असलेली शहरे). जागतिक बँकेच्या क्रमवारीमध्ये मोठी मजल मारण्यामध्ये मुंबईचे सर्वात मोठे योगदान आहे. **"ली कुआन येवू स्कूल ऑफ पब्लिक पॉलिसी, सिंगापूर" या आशियाई प्रतिस्पर्धात्मक संस्थेच्या निर्देशांकानुसार सन २०१६ मध्ये इज ऑफ डुइंग बिझनेस मध्ये महाराष्ट्राचा देशात पहिला क्रमांक आहे.**

१.१.६ **अनुकूल धोरण व आश्वासक विश्वासार्हता** :- राज्यात व्यवसायासाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्यासाठी महाराष्ट्राने उद्योगांसाठी प्रक्षेत्रा निहाय विविध पुरोगामी धोरणे (Progressive Sectorial Policies) आखली आहेत. या विविध धोरणांमुळे राज्याला औद्योगिक गुंतवणुकीतील आपले अग्रस्थान कायम राखणे शक्य झाले आहे. महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१३ नुसार सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योग, मोठे उद्योग, विशाल व अतिविशाल उद्योग यांना प्रोत्साहने देण्यात आली, तसेच रोजगार प्रवण विशाल उद्योगांना अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात आली. राज्यात "मॅग्नेटिक महाराष्ट्र" आणि "मेक इन इंडिया" यासारख्या मोठया कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले, तसेच राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय रोड शोमध्ये राज्याने सहभाग घेतला. या सर्व प्रयत्नांमुळे गेल्या पाच वर्षांत ८ लक्ष कोटी रुपयांपेक्षा जास्त औद्योगिक गुंतवणूकीचे प्रस्ताव प्राप्त झाले.

## २. दृष्टीकोन :-

महाराष्ट्र शाश्वत विकासास चालना देणारे एक जागतिक गुंतवणूक, उत्पादन व तांत्रिक केंद्र.

## ३. मिशन :-

सन २०२५ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था १ ट्रिलियन युएस डॉलर पर्यंत वाढविण्याकरिता उत्पादन निर्मिती वातावरणात वृध्दी करण्यासाठी, व्यवसाय करण्यासाठी सुलभता निर्माण करुन त्याद्वारे जागतिक उत्पादक आणि गुंतवणूकदारांसाठी सर्वाधिक पसंतीचे ठिकाण म्हणून विकसित करणे व सर्वाधिक रोजगार निर्मिती करुन त्याद्वारे संतुलित प्रादेशिक आणि सर्वसमावेशक प्रगती साध्य करणे.

४. **लक्षांक :-**

अ. सन २०२३-२४ पर्यंत राज्याच्या सकल उत्पन्नात "उत्पादन" क्षेत्राचा हिस्सा २५ % पर्यंत आणण्याचे उद्दिष्ट गाठण्यासाठी "उत्पादन क्षेत्राच्या" वाढीचा दर १२ ते १३ टक्के पर्यंत राखणे.

ब. १० लाख कोटी एवढया मुल्याची गुंतवणूक आकर्षित करणे.

क. सन २०२३-२४ पर्यंत ४० लाख लोकांसाठी रोजगारांच्या संधी निर्माण करणे.

५. **धोरणाची उद्दिष्टे व साध्य करण्यासाठी नियोजन** :

५.१ **व्यवसायास पोषक वातावरण निर्माण करुन औद्योगिक गुंतवणूकीतील आघाडीचे स्थान अबाधित ठेवणे**.

५.१.१ विशिष्ट क्षेत्रांच्या गरजांनुसार समर्पित अत्याधुनिक पायाभूत सुविधा विकसित करणे.

५.१.२ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत उद्योगांसाठी जमीन अधिकोष निर्माण करणे.

५.१.३ महत्वाच्या तसेच उदयोन्मुख तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्पांसाठी विशेष आर्थिक प्रोत्साहनांची तरतूद करणे.

५.१.४ विनिर्दिष्ट थ्रस्ट सेक्टरमधील उद्योगांवर विशेष लक्ष केंद्रीत करुन क्षेत्रनिहाय विशिष्ट प्रोत्साहन / धोरणाव्दारे गुंतवणूकीला चालना देणे.

५.१.५ सरकार, उद्योग आणि शैक्षणिक जगताचा सामाईक व्यासपीठावर आणणे.

५.१.६ संशोधन व विकास आणि स्टार्टअपमध्ये गुंतवणूकीस प्रोत्साहन देणे.

५.१.७ इज ऑफ डुइंग बिझनेसला चालना देणे, राज्याशी संबंधित सर्व सेवा व मंजुऱ्या एकाच ठिकाणी मिळवून देण्यासाठी "मैत्री" ही एक खिडकी योजना अधिक सक्षम करणे.

५.१.८ गुंतवणूक आणि निर्यातीस प्रोत्साहन देण्यासाठी राज्यस्तरीय परिषदांची स्थापना करणे.

५.१.९ शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याकरीत शेतीमालावरील प्रक्रियेस प्राधान्य देणे.

५.२ **सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना प्रोत्साहन देऊन रोजगार निर्मितीची उच्च पातळी कायम ठेवणे.**

५.२.१ मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजनेव्दारे (CMEGP) राज्याच्या लघु व मध्यम उद्योगांसाठीच्या नवीन फ्लॅगशिप योजनेचा शुभारंभ करुन मोठ्या प्रमाणात रोजगाराच्या संधी निर्माण करणे.

५.२.२ सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांसाठी व लहान प्रकल्पांसाठी विशेष आर्थिक सवलतींची योजना तयार करणे.

५.२.३ औद्योगिक समुह विकसनाव्दारे जास्त रोजगार निर्मितीची क्षमता असलेल्या सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांचे सबलीकरण करणे.

५.२.४ तंत्रज्ञानाचा स्वीकार व प्रसार, बाजारपेठ विश्लेषण, प्रशिक्षण इत्यादीसह अनेक बाबींमध्ये सुधारणा होण्याकरीता सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना संस्थात्मक पाठबळ देणे.

५.२.५ रोजगार निर्मितीवर आधारित विशाल व अतिविशाल उद्योगांना अतिरिक्त आर्थिक पाठबळ देऊन वाढीव रोजगार निर्मितीस हातभार लावणे.

५.२.६ उद्योग, तांत्रिक संस्था व कौशल्य विकास विभागांमध्ये प्रभावी समन्वय साधून कुशल मनुष्यबळ निर्माण करण्यास प्रोत्साहन देणे.

**५.३ प्रादेशिकदृष्टया संतुलित, पर्यावरण दृष्टया शाश्वत व सर्वसमावेशक औद्योगिक वाढीस प्रोत्साहन देणे.**

५.३.१ अविकसित विभागांमध्ये उद्योग स्थापन करण्याकरीता विशेष आर्थिक प्रोत्साहन देणे.

५.३.२ अंतिम टप्प्याच्या जोडणीसाठी (last mile connectivity) निर्णायक पायाभूत सुविधा निधी (Critical Industrial Infrastructure Fund) वृध्दी करणे.

५.३.३ खाजगी औद्योगिक उद्यानांमध्ये पूरक पायाभूत सुविधा निर्माण करणे.

५.३.४ सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योग तसेच महिला व अनुसूचित जाती / अनुसूचित जमातींमधील उद्योजकांसाठीच्या औद्योगिक क्षेत्रांमधील पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी आर्थिक प्रोत्साहन देणे.

५.३.५ बंद पडलेल्या उद्योगांच्या पुनरुज्जीवनासाठी पाठबळ देणे.

५.३.६ हरित औद्योगिकीकरणासाठी प्रोत्साहन देऊन पर्यावरणदृष्टया शाश्वतता सुनिश्चित करणे.

**६. धोरणाचा कालावधी :-**

सदर धोरणाचा कालावधी दिनांक १ एप्रिल, २०१९ पासून पुढील पाच वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहील.

**७ सुविकसित औद्योगिक पायाभूत सुविधा निर्माण करणे.**

जागतिक स्तरावरील उत्पादक कंपन्या, गुंतवणूकदार आणि इतर कॉर्पोरेट्सना राज्याकडे आकर्षित करण्यासाठी व औद्योगिक विकासासाठी गुणवत्तापूर्ण पायाभूत सूविधा हा महत्वाचा घटक आहे. महाराष्ट्रात सर्वोत्तम औद्योगिक पायाभूत सुविधा उपलब्ध आहेतच याशिवाय राज्यभर विस्तारलेल्या विविध औद्योगिक वसाहतींमध्ये जागतिक दर्जाच्या पायाभूत सुविधांचा विकास करणे व अस्तित्वातील सुविधांच्या बळकटीकरणासाठी जोमाने प्रयत्न केले जातील. औद्योगिक पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (एमआयडीसी) समर्पित यंत्रणा म्हणून कार्यरत राहील.

**७.१ जमिनीची उपलब्धता व पायाभूत सुविधांमध्ये सुधारणा करणे.**

७.१.१ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (म.औ.वि.म.) मुख्यत्वे त्यांच्या अस्तित्वात असलेल्या औद्योगिक वसाहतींमध्ये आवश्यक तेथे विद्यमान पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी कटिबध्द असेल. नवीन औद्योगिक वसाहतींमध्ये जागतिक दर्जाच्या पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरीता देखिल म.औ.वि.महामंडळ कटिबध्द असेल. तसेच भविष्याची गरज ओळखून सुनियोजित औद्योगिक क्षेत्रांत देखिल म.औ.वि.महामंडळ पायाभूत सुविधा विकसित करेल. उदा. समृद्धी महामार्गामधील २० औद्योगिक नोड्स, डीएमआयसी आणि विविध केंद्रीय / राज्य सरकारी औद्योगिक कॉरिडॉर प्रकल्प.

७.१.२ उद्योगांच्या गरजेनुसार नवीन औद्योगिक वसाहती (बहु-क्षेत्र आणि क्षेत्र निहाय) नियोजित आणि विकसित केल्या जातील. यासाठी, पुढील ५ ते १० वर्षात राज्यभर व्यवस्थित आणि प्रादेशिकरित्या संतुलित औद्योगिक विकासास चालना देण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ एक यथार्थदर्शी आराखडा (Perspective Plan) तयार करेल. या भागात हरित औद्योगिकीकरणास उत्तेजन देण्यासाठी आवश्यक उपाययोजना केल्या जातील.

७.१.३ चौथी औद्योगिक क्रांती म्हणून संबोधलेल्या भविष्यातील उद्योग ४.० आणि उच्च तांत्रिक जसे की एअर टॅक्सी, ड्रोन, ड्रायव्हरलेस वाहने, इत्यादी यांच्या गरजा विचारात घेऊन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळद्वारे आवश्यक औद्योगिक पायाभूत सुविधांचे नियोजन करण्यात येईल.

७.१.४ राज्यात मोठया प्रमाणावर जमीन उपलब्ध असून देखील रु.१० लाख कोटींच्या गुंतवणूकीस चालना देण्यासाठी उद्योगाकरीता आवश्यक जमीन उपलब्ध होणे गरजेचे आहे. ही गरज विचारात घेऊन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ मागणीचे मुल्यमापन करुन राज्यभरात जमीन अधिकोष निर्माण करेल.

७.१.५ राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे क्षेत्र वगळता १० एकर पेक्षा जास्त सलग क्षेत्र असलेल्या विविध औद्योगिक घटकांच्या विकासासाठी अथवा १० एकर पेक्षा जास्त क्षेत्र असलेल्या औद्योगिक जमिनीच्या तुकड्याच्या विकसनासाठी एकाकी विकासकास तसेच भारत सरकार व राज्य शासनाच्या योजनांच्या अंतर्गत मंजूर औद्योगिक समुहांसाठी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास (म.औ.वि.मं) विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित केले जाईल. म.औ.वि.महामंडळ व्यवसाय सुलभीकरणासाठी केवळ परवानगी देईल तथापि अशा कोणत्याही क्षेत्रातील पायाभूत सुविधा म.औ.वि.मं कडून प्रदान केल्या जाणार नाहीत.

७.१.६ राज्यातील वेअरहाऊसिंग व लॉजिस्टिक सुविधांच्या विकासासाठी एमआयडीसी किमान ५०० एकर औद्योगिक क्षेत्र आरक्षित करुन ठेवेल.

७.१.७ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रांच्या धर्तीवर, सर्व सहकारी औद्योगिक वसाहतींमध्ये मुलभूत चटई क्षेत्र निर्देशांकाच्या वर ५० टक्के अतिरिक्त चटई क्षेत्र अनुज्ञेय राहील. त्यासाठी म.औ.वि.महामंडळाने राज्य सरकारची मंजूरी घेऊन निश्चित केलेल्या दराप्रमाणे प्रीमियम आकारला जाईल.

७.१.८ सूक्ष्म आणि लघु उद्योगांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून फ्लॅटेड गाळ्यांची निर्मिती विशेष वाहन हेतू (SPV ) धर्तीवर करण्यात येईल.

७.१.९ निर्णायक औद्योगिक पायाभूत सुविधा पुरविण्याकरिता आणि अंतिम टप्पा जोडणी विकसित करण्यासाठी, औद्योगिक पायाभूत सुविधा निधी (Critical Industrial Infrastructure Fund) निर्माण केला जाईल. औद्योगिक पायाभूत सुविधा निधी मार्फत आवश्यकतेनुसार सहकारी औद्योगिक वसाहतींचा विकास करण्यात येईल.

७.१.१० महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ औद्योगिक वसाहतींमध्ये सार्वजनिक आरोग्य सुविधांसाठी राखीव ठेवलेली जमीन  संबंधित विभागांद्वारे विकसित केली जाईल. विशेषत: राज्य कामगार विमा मंडळाद्वारे हॉस्पीटलची (ESIC) सुविधा संबंधित औद्योगिक संघटनांच्या मागण्या व आवश्यकतेनुसार सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत पुरविण्यात येईल.

७.१.११ राज्य सरकारच्या संबंधित धोरणांनुसार संबंधित क्षेत्रांसाठी अनुज्ञेय असलेल्या अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक मर्यादेत (माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा, जैव तंत्रज्ञान, गारमेंटिंग, जेम्स ॲण्ड ज्वेलरी, लॉजिस्टिक्स ॲण्ड वेअरहाऊसिंग) जमीन वापराची अदलाबदल राज्य सरकारच्या परवानगीने आवश्यकतेनुसार मंजूर केली जाईल.

७.१.१२ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास (म.औ.वि.म) नियोजनबध्द औद्योगिक विकासासाठी राज्य शासनाची अथवा राज्य शासनाच्या उपक्रमाकडील जमिनींची आवश्यकता असल्यास अशा जमिनी विनामूल्य महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास (म.औ.वि.म) उपलब्ध करुन देण्यात येतील.

**७.२ विशेष प्रकल्पांचा लाभ घेणे:-**

केंद्र / राज्य  शासनाने विशेष प्रकल्प म्हणून घोषित केलेल्या महाराष्ट्र समृध्दी महामार्ग, दिल्ली मुंबई औद्योगिक मार्गिका, सागरमाला, भारतमाला इत्यादी महत्वपूर्ण प्रकल्पांच्या मार्गावर औद्योगिक वसाहती उभारण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा उद्योग विभाग प्रोत्साहन देईल. म.औ.वि.महामंडळ हे केंद्र /राज्य शासनाच्या विशेष प्रकल्पांच्या मार्गावरील औद्योगिक नोडस् विकसित करण्यासाठी "नोडल एजन्सी" म्हणून काम करेल.

**७.२.१ महाराष्ट्र समृध्दी महामार्ग:-**

महाराष्ट्र समृध्दी महामार्ग हा नागपूर व मुंबई यांना जोडणारा ७०० किमी लांबीचा एक सुपर कम्युनिकेशन्स एक्सप्रेसवे आहे. हा मार्ग १० प्रमुख जिल्हयामधून आणि १४ अन्य प्रभाव जिल्ह्यांमधून जात आहे. द्रूतगतीमार्गा लगतच्या २० ठिकाणी औद्योगिक क्षेत्रांचे नियोजन करण्यात येईल. ही औद्योगिक क्षेत्रे प्रभाव क्षेत्रातील ग्रामीण भागात अर्थव्यवस्थेमध्ये आमूलाग्र बदल घडवतील. या नोड्ससाठी औद्योगिक नियोजनाकरिता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे नियोजन प्राधिकरण असेल. एक्सप्रेसवे मोठ्या प्रमाणात प्रवासाचा वेळ कमी करेल. या मार्गावर लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग केंद्रांसोबत नागपूर-वर्धा प्रमुख लॉजिस्टिक कॉरिडॉर म्हणून विकसित करण्याचे नियोजन आहे.  या मार्गावर चार्जिंग स्टेशन्स स्थापन करून हा मार्ग इलेक्ट्रिक व्हेइकल (ईव्ही) एक्सप्रेसवे म्हणून देखील  विकसित केला जाईल.

समृध्दी महामार्ग महाराष्ट्र राज्याला दिल्ली-मुंबई औद्योगिक कॉरीडॉर आणि वेस्टर्न डेडिकेटेड फ्रेट कॉरिडॉरशी जोडेल. महाराष्ट्रातील काही भाग या कॉरिडॉरबरोबर व जेएनपीटी या देशातील सर्वात मोठया कंटेनर पोर्टबरोबर जोडले जातील. यामुळे राज्याच्या आयात-निर्यात व्यापारामध्ये मोठया प्रमाणात वृध्दी होईल.

### ७.२.२ दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर (डीएमआयसी):-

डीएमआयसी ही केंद्र शासनाची पायाभूत सुविधा योजना असून हिचे लक्ष्य हे नवीन औद्योगिक शहरांचा 'स्मार्ट सिटीज' म्हणून विकास करणे आणि पायाभूत सुविधा क्षेत्रातील उच्च तंत्रज्ञानाचा अंतर्भाव करणाऱ्या “जागतिक औद्योगिक उत्पादन आणि व्यापार केंद्र”चा विकास करणे हे उद्दिष्ट आहे. याअंतर्गत महाराष्ट्रात दोन प्रकल्प नियोजित आहेत.

अ) शेंद्रा बिडकिन इंडस्ट्रियल एरिया (एसबीआयए) - प्रकल्पाचे एकूण क्षेत्र सुमारे ८४ वर्ग कि.मी आहे. औरंगाबाद नजीक विद्यमान औद्योगिक क्षेत्र तसेच विद्यमान विमानतळ आणि रेल्वे या बाबी निर्यात-आधारित व्यवसायासाठी उपयुक्त आहेत.

ब) दिघी पोर्ट इंडस्ट्रियल एरिया (डीपीआयए) - प्रकल्पाच्या विकासासाठीचे एकूण क्षेत्र २५३ वर्ग कि.मी आहे. सदरचा नोड हे एक बंदर, व्यापार आणि औद्योगिक केंद्र आहे ज्याद्वारे अंशत: मुंबईतील जागतिक व्यापार, वाणिज्य आणि उद्योग वृध्दींगत होऊन ते भारताचे पश्चिम प्रवेशद्वार म्हणून ओळखले जाईल.

### ७.२.३ सागरमाला आणि तटीय आर्थिक क्षेत्रे (कोस्टल इकॉनॉमिक झोन्स-सीईझेड):-

किनारपट्टीच्या विकासासाठी तसेच बंदरांचे औद्योगिकीकरण आणि किनारपट्टीच्या समुदाय विकासासह बंदरांच्या विकासासाठी सागरमाला प्रकल्प हा भारत सरकारचा महत्वाकांक्षी प्रकल्प आहे. एकूण १४ तटीय आर्थिक क्षेत्रांपैकी (सीईझेड) पैकी उत्तर कोकण (जेएनपीटी जोडणी बंदर) आणि दक्षिण कोकण (दिघी व जयगड बंदर) या दोन सीईजेडच्या विकासाचे नियोजन महाराष्ट्र राज्यात आहे. राज्य सीईझेडमधील क्षेत्र विशिष्ट समर्पित औद्योगिक क्षेत्रात स्थापन होणाऱ्या विविध तटीय आर्थिक एककांना (कोस्टल इकॉनॉमिक युनिट-सीईयू) राज्य शासनाकडून आवश्यक सहकार्य करण्यात येईल.

### ७.३ निर्णायक औद्योगिक पायाभूत सुविधा निधी :-

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रा बाहेरील औद्योगिक क्षेत्रामध्ये महत्त्वाच्या पायाभूत सुविधा जसे की अंतिम टप्प्याची रस्तेजोडणी, समर्पित विद्युतवाहिनी, पाणीपुरवठा इत्यादी मूलभूत सुविधा उपलब्ध नसल्याने उद्योगांसाठी मोठया प्रमाणावर अडथळे निर्माण होतात. अशा प्रकारच्या मुलभूत पायाभूत सुविधांसाठी संबंधितांकडून निधीची प्रचंड मागणी आहे. या संदर्भात कोणत्याही विभागाच्या अर्थसंकल्पात तरतूद करण्यात आलेली नाही.अश्या निधीची आवश्यकता आणि त्याचा दृश्यमान प्रभाव लक्षात घेता, महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१३ दरम्यान तयार करण्यात आलेला निर्णायक औद्योगिक पायाभूत सुविधा निधी (क्रिटिकल इंडस्ट्रियल इन्फ्रास्ट्रक्चर फंड - सीआयआयएफ) मध्ये वाढ करुन या धोरणाच्या कालावधीत रु.१००० कोटी इतक्या वाढीव संचितासह (corpus) चालू राहील. या निधीचा वापर, अंतिम टप्प्यापर्यंतच्या पायाभूत सुविधांची जोडणी देण्यासाठी आणि विद्युत जाळे, सांडपाणी प्रक्रिया संच, रस्ते इत्यादीसारख्या औद्योगिक पायाभूत सुविधांच्या निर्मिती आणि उन्नतीसाठी केला जाईल. या निधीचा निर्यातक्षम घटक, औद्योगिक समूह तसेच औद्योगिक उद्यानांसाठीच्या

पायाभूत सुविधांबाबत उद्भवणाऱ्या अडचणी सोडवण्याकरिता वापर केला जाईल. औद्योगिक समूह आणि विविध औद्योगिक उद्यानांच्या पायाभूत सुविधांसाठी आणि पायाभूत सुविधांसाठी मागील धोरणात नमूद केल्याप्रमाणे मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती सदर निधीची मंजूरी व व्यवस्थापन करेल. राज्य शासन कार्यक्रमावरील खर्चाव्दारे धोरण कालावधीत अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे टप्प्याटप्प्याने निधी उपलब्ध करुन देईल.

**७.४ खाजगी औद्योगिक मुलभूत सुविधा विकासासाठी चालना देणे.**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे औद्योगिक क्षेत्रामध्ये अपूरी जमीन आहे, याच्या परिणामस्वरुप बऱ्याच भागात अनियोजित औद्योगिक विकास झाला आहे. याचे सुसूत्रीकरण करण्यासाठी आणि स्थानिक उद्योजकता प्रोत्साहित करण्यासाठी, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांवर लक्ष केंद्रित असलेल्या खाजगी औद्योगिक वसाहतीच्या विकासासाठी खाजगी गुंतवणूक आकर्षित करण्याचा राज्याचा उद्देश आहे.

७.४.१ औद्योगिक पायाभूत सुविधांच्या विकासासाठी खाजगी क्षेत्रातील सहभागास प्रोत्साहन देण्याकरिता, या धोरणामध्ये निश्चित केलेल्या प्राधान्य क्षेत्रांशी (Thrust sector) संबंधित औद्योगिक उद्याने स्थापन करण्यासाठी प्रकल्पांना सहाय्य करण्यात येईल.

७.४.२ महिला / अनुसूचित जाती /अनुसूचित जमाती उद्योजकांकडून सूक्ष्म,लघु व मध्यम उद्योजकांसाठी विकसित केलेल्या औद्योगिक वसाहतींना प्राधान्य दिले जाईल आणि जास्तीचे १००% आर्थिक सहाय्य दिले जाईल. त्यासाठीचा निधी सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विकास विभाग यांचेकडून उपलब्ध करुन घेण्यात येईल.

७.४.३ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे या खाजगी औद्योगिक वसाहतींसाठी नियोजन प्राधिकरण असेल.

**८ प्राधान्य क्षेत्रांना (Thrust Sectors) प्रोत्साहित करणे.**

उदयोन्मुख उच्च तंत्रज्ञानाच्या क्षेत्रांकडे औद्योगिक विकास वळविण्यासाठी व रोजगार निर्माण करण्यासाठी राज्य शासनाने खालील क्षेत्रांना प्राधान्य दिले आहे. थ्रस्ट सेक्टर मधील प्रकल्पांना जागावाटपामध्ये प्राधान्य दिले जाईल व विशेष प्रोत्साहने देखील देण्यात येतील.

**८.१ विद्युत वाहने (उत्पादन, पायाभूत सुविधा व देखभाल)**

तेलाचे घटते साठे व वाढते प्रदूषण यावर शाश्वत विकासामध्ये भविष्यात विद्युत वाहने हा उत्तम पर्याय आहे. केंद्र शासनाने नॅशनल इलेक्ट्रीक मोबीलिटी प्लॅन (NEMP) हा ई-मोबीलिटी कार्यक्रम सुरु केला असून या अंतर्गत विद्युत वाहनांच्या वापरास चालना देण्यासाठी विद्युत वाहन उत्पादक, वाहनांचे चार्जिंग करण्यासाठी पायाभूत सुविधा निर्माण करणाऱ्या संस्था, वाहनांच्या ताफ्याचे परिचालक, सेवा पुरवठादार इत्यादींचा समावेश असलेले वातावरण निर्माण करण्यासाठी प्रयत्न चालविले आहेत. रस्त्यावरील २५ दशलक्ष

वाहनांचा विचार करुन व वाहन उद्योग हा महत्वाचा उद्योग असल्यामुळे महाराष्ट्र शासनाने राज्यात जास्तीत जास्त विद्युत वाहनांचे उत्पादन व वापर करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यामुळे राज्य शासनाने विद्युत वाहने व त्यांचे उत्पादन, पायाभूत सुविधा व देखभाल हे प्राधान्य क्षेत्र म्हणून निर्धारित केले आहे. सदर क्षेत्राला प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शासनाने विद्युत वाहने व संबंधित पायाभूत सुविधा धोरण-२०१८ घोषित केले आहे.

### ८.२ हवाई व संरक्षण उत्पादन उद्योग

भारत हा जगातील सर्वात मोठा शस्त्रांचा आयातदार देश आहे. (सिप्रीच्या मार्च-२०१८ च्या अहवालानुसार सन २०१३-२०१७ या कालावधीतील एकूण जागतिक आयातीपैकी १२ टक्के शस्त्रांची आयात भारताने केली होती.) त्यामुळे हवाई व संरक्षण उद्योगांना तयार बाजारपेठ उपलब्ध आहे. त्याशिवाय भारताचा संरक्षण खर्च गेल्या दशकात २३१ टक्के वाढला असून पुढील १० वर्षात तो रु.७.७४ लाख कोटी (१२० अब्ज अमेरिकी डॉलर) इतका वाढण्याचा अंदाज आहे. महाराष्ट्रात विविध शस्त्रास्त्र उत्पादन करणारे कारखाने असण्याच्या पार्श्वभूमीवर भारतात होणाऱ्या हवाई व संरक्षण उद्योगातील गुंतवणूकीचा लाभ घेण्यास राज्य शासन सज्ज असून तो केंद्रशासनाच्या “मेक इन इंडिया” पुढाकारास चालना देईल. त्यानुसार राज्य शासनाने अवकाश व संरक्षण उद्योगाला प्राधान्य क्षेत्र म्हणून निर्धारित केले आहे. राज्याने अवकाश व संरक्षण उत्पादन धोरण-२०१८ सुध्दा घोषित केले आहे.

### ८.३ उद्योग ४.० (कृत्रिम बुध्दीमत्ता, त्रिमिती छपाई, महाजाल, यंत्रमानव विज्ञान, अतिसूक्ष्म तंत्रज्ञान इत्यादी)

चौथी औद्योगिक क्रांती ही वेगाने सुधारणा होत असलेल्या माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील उपकरणामुळे होईल. जग उद्योग, महाजाल (IoT), महाजाल आधारीत किऑस्क (kiosks), एमबेडेड टेक्कनॉलॉजी (Embedded Tecnology), त्रिमिती छपाई, कृत्रिम बुध्दीमत्ता, यंत्रमानव विज्ञान, अतिसूक्ष्म तंत्रज्ञान, तसेच अन्यतंत्रज्ञानांची सांगड घातल्यामुळे उद्योग ४.० म्हणजेच चौथ्या औद्योगिक क्रांतीचा उदय झाला आहे. उद्योग ४.० वर आधारित योजनांची अंमलबजावणी करण्यास जर्मनी, जपान, दक्षिण कोरिया व अमेरिका इत्यादी विकसित देशांनी सुरुवातही केली आहे. देशांतर्गत उद्योग जागतिक स्पर्धेत टिकून रहावा म्हणून राज्य शासन उद्योग ४.० मधील तंत्रज्ञानात गुंतवणूक करण्यास प्रोत्साहन देईल, यामध्ये संयुक्त उपक्रम असलेल्या घटकांचाही समावेश असेल.

### ८.४ एकात्मिक डेटा सेंटर पार्क्स (आयडीसीपी) स्थापनेस प्रोत्साहन

भारतात डेटा साठवणूक करण्याची मागणी मोठया प्रमाणावर होत आहे. मुंबई महानगराचे भौगोलिक स्थान, उत्कृष्ट उर्जा संबंधीच्या सुविधा व समुद्राखालून मुंबई येथे येणाऱ्या डेटा केबल्समुळे मुंबई या शहराची जागतिक स्तरावरील सर्वात मोठे डेटा साठवणूक हब बनण्याची क्षमता आहे. एकात्मिक डेटा सेंटर पार्कच्या उभारणीस चालना व त्यांना

प्रोत्साहन देणे गरजेचे आहे. टीयर-४ डेटा सेंटरची उभारणी विकासक कंपनी यांच्याकडून करण्यात येईल व अन्य विविध कंपन्या त्यातील स्टोअरेज स्पेसचा उपयोग करुन घेतील. खाजगी विकासकांनी उभारलेले एकात्मिक डेटा सेंटर पार्क व त्यातील डेटा स्टोरेज स्पेस वापरणाऱ्या कंपन्या या सामुहीक प्रोत्साहन योजनेअंतर्गत आर्थिक प्रोत्साहने दिली जातील. यामध्ये राज्य वस्तु व सेवा कर परतावा व अन्य प्रोत्साहनांना कमाल १० वर्षासाठी (जमीन व इमारतीतील गुंतवणूक वगळता) पात्र असतील. सदर धोरणाच्या कालावधीत ज्या टीयर-४ प्रवर्गातील पहिल्या पाच (५) एकात्मिक डेटा सेंटर पार्कसची किमान गुंतवणूक १५०० कोटी आहे, त्याचे विकासक कंपन्या उपरोक्त प्रोत्साहनास पात्र असतील. राज्याचे माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण -२०१५ मध्ये एकात्मिक डेटा सेंटरच्या संदर्भात समूचित ठिकाणी आवश्यक सुधारणा झाल्याचे मानण्यात येईल.

**८.५ वस्त्रोद्योग यंत्रसामुग्रीचे उत्पादन**

कापूस उत्पादनामुळे वस्त्रोद्योगात महाराष्ट्र आघाडीवर राहिला आहे. वस्त्रनिर्मिती साठीची यंत्रसामुग्री मोठ्या प्रमाणावर आयात केली जाते. वस्त्रोद्योग यंत्रसामुग्री तयार करणाऱ्या उद्योगांना थ्रस्ट सेक्टर म्हणून प्राधान्य देण्यात येईल तसेच उचित प्रोस्ताहने देण्यात येतील.

**८.६ जैव तंत्रज्ञान, वैद्यकीय निदान उपकरणे**

उच्च तंत्रज्ञान उत्पादन क्षेत्रातील राज्याच्या लाभदायक स्थितीचा फायदा घेऊन जैवतंत्रज्ञान व वैद्यकीय निदान करणारी उपकरणे ह्यांच्या उत्पादनामध्ये अग्रेसर राहण्याचा महाराष्ट्राचा मानस आहे. या क्षेत्राकरिता घेण्यात येणारे महत्वाचे पुढाकार खालीलप्रमाणे आहेत.

अ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ राज्यातील योग्य ठिकाणी (अन्य ठिकाणांच्या सोबतच नाशिक, पुणे औरंगाबाद व नागपूर) समर्पित जैवतंत्रज्ञान व वैद्यकीय निदान उपकरणांच्या निर्मितीसाठी उद्याने उभारेल.

ब सामायिक सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प, चाचणी व प्रमाणिकरण प्रयोगशाळेसारख्या समर्पित पायाभूत सोयीसुविधा जैवतंत्रज्ञान व वैद्यकीय निदान उपकरणांच्या निर्मिती क्षेत्रासाठी उभारल्या जातील.

क जैवतंत्रज्ञान व वैद्यकीय निदान करणारी उपकरणे यांच्याकरिता उत्पादन उद्यान स्थापन करण्यात येईल.

**८.७ कृषी व अन्न प्रक्रिया उद्याने (फक्त द्वितीय व तृतीय अन्न प्रक्रिया उद्याने)**

कृषी व अन्न प्रक्रिया उद्योगात संपूर्ण राज्यभरात विशेषत: सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांमध्ये रोजगार निर्मितीसाठी प्रचंड वाव आहे. द्वितीय व तृतीय अन्न प्रक्रिया घटकांमध्ये वाढीची प्रचंड क्षमता आहे. त्यामुळे प्रत्येक जिल्हयामध्ये लघु अन्न प्रक्रिया उद्याने स्थापन करण्याचा राज्य शासन प्रयत्न करेल. लघु अन्न प्रक्रिया उद्याने किमान १० एकर जमीनीवर उभारण्यात यावीत. लघु अन्न प्रक्रिया उद्याने विकसित करण्यासाठी आजूबाजूच्या शेतकऱ्यांच्या जमिनीचे एकत्रिकरण अनुज्ञेय राहील.

सदर उद्यानांना विशिष्ट वस्तू आधारित एककांसाठी समर्पित आवश्यक पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतील. या क्षेत्रातील उद्योगांना विशेष प्रोत्साहने देण्यात येतील.

### ८.८ माहिती तंत्रज्ञान (IT) व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा (ITeS)

१२०० पेक्षा जास्त आज्ञावली विकसित करणाऱ्या उद्योग घटकांचे माहेरघर असणाऱ्या व देशाच्या एकूण आज्ञावली निर्यातीपैकी ३० टक्के वाटा असणाऱ्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगास पोषक वातावरण महाराष्ट्रात उपलब्ध आहे. राज्यामध्ये पुणे व मुंबई ही ह्या माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाची प्रमुख केंद्रे आहेत. महाराष्ट्राला माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात गुंतवणूकीसाठी एक सर्वाधिक पसंतीच्या स्थानावर नेण्यासाठी राज्याने यास एक थ्रस्ट सेक्टर म्हणून घोषित केले आहे तसेच स्वतंत्र प्रोत्साहन योजना देखील जाहीर केली आहे.

### ८.९ इलेक्ट्रॉनिक प्रणाली संरचना व उत्पादन (ESDM) व सेमीकंडक्टर फॅब्रिकेशन (FAB)

इलेक्ट्रॉनिक्स हार्डवेअर उत्पादनांसाठी देशांतर्गत मागणी दरवर्षी देशात वाढत आहे आणि त्यापैकी बहुतेक मागणी आयातीद्वारे पूर्ण केली जाते. यामुळे या थ्रस्ट क्षेत्रामध्ये विकासाची प्रचंड क्षमता आणि मोठ्या रोजगार संधी देखील आहेत. इलेक्ट्रॉनिक्स हार्डवेअर उद्योगासाठी राज्यात अनुकूल वातावरण अस्तित्वात असल्यामुळे भारतातच इलेक्ट्रॉनिक्स वस्तूंचे उत्पादन करण्याच्या केंद्र शासनाच्या घोषित उद्दिष्टांचा लाभ घेण्यासाठी राज्य सज्ज आहे. राज्यासाठी ह्या उद्योगाचे असलेले अन्य साधारण महत्व लक्षात घेऊन राज्य शासनाने “महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण-२०१६” हे विशेष धोरण घोषित केले आहे.

### ८.१० लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग

भारतात लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग उद्योग १० टक्के दराने वाढत आहे व सन २०२० पर्यंत तो रु.१३.२१ लाख कोटी (२०५ अब्जअमेरिकी डॉलर) मुल्य असलेला उद्योग असेल. राज्याचे मोक्याचे स्थान, बंदर व विमानतळांच्या माध्यमातून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरांशी जोडणी असल्यामुळे लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग उद्योगाची वाढ होण्यासाठी राज्य हे आदर्श स्थान आहे. या मार्गांवर लॉजिस्टिक्स् व वेअरहाऊसिंग हब सोबतच नागपूर-वर्धा मार्गावर प्रमुख लॉजिस्टिक कॉरिडॉर बनविणे नियोजित आहे. राज्य शासनाने “लॉजिस्टिक्स उद्यान धोरण २०१८” हे विशेष धोरण घोषित केले आहे.

### ८.११ हरित ऊर्जा / जैवइंधनाचे उत्पादन

महाराष्ट्रामध्ये २५ दशलक्षापेक्षा अधिक वाहने रस्त्यावर आहेत आणि हा आकडा नजिकच्या भविष्यात वाढतच जाणार आहे. परिणामी वाढत्या कार्बन वायु उत्सर्जन तसेच तेलाच्या वाढत्या आयाती बाबत चिंता असल्याने त्यावर मात करण्यासाठी हरित ऊर्जा / जैव इंधनाच्या उत्पादनाला चालना देण्यासाठी आवश्यक सहकार्य देणे आवश्यक आहे. जैवइंधन (इथेनॉलसहीत), सर्व पीकांपासून निर्माण होणारे बायोमास इत्यादी नुतनीकरणीय ऊर्जा स्त्रोतांकडे वळल्यास राज्यातील वातावरण स्वच्छ होण्याबरोबरच तेल आयातीवरील राज्याचे अवलंबित्व सुध्दा कमी होईल.

याबाबतीत जैव-इंधनासाठी योग्य असलेल्या अखाद्य तेलबीयांची आदिवासी व अविकसित वन क्षेत्रामध्ये लागवड करण्यास तसेच त्याच्या कापणीस राज्यशासन परवानगी देईल. त्यामुळे जैवइंधन / हरित ऊर्जा उत्पादनाला प्राधान्य क्षेत्र म्हणून निर्धारित करण्यात आले आहे. राज्य शासन सदर क्षेत्राला अधिक प्रोत्साहने देईल.

**८.१२ क्रिडा व व्यायामशाळा उपकरण उत्पादन**

आर्थिक परिस्थितीत वेगाने सुधारणा होत असल्यामुळे, शिल्लक पडणाऱ्या उत्पन्नात वाढ आणि तंदुरुस्तीकडे पहाण्याचा दृष्टीकोन बदलल्याने क्रिडा व व्यायाम शाळांसाठी निगडीत वस्तू व सेवांना देशात मागणी वाढली आहे. त्यामुळे क्रिडा व व्यायामशाळेसाठी लागणाऱ्या उपकरणांचे उत्पादन करण्याची नवीन व्यवसाय संधी खुली झाली आहे. हा श्रमिक केंद्रीत उद्योग भारतातील ५.० लाख लोकांना रोजगार पुरवितो. क्रिडा व व्यायामशाळा उपकरणांच्या उत्पादनास राज्य शासन प्रोत्साहन देईल.

**८.१३ अणुऊर्जा प्रकल्पांच्या उपकरणांचे उत्पादन -**

मेक इन इंडिया कार्यक्रमांतर्गत अणुऊर्जा प्रकल्पासाठी लागणाऱ्या उपकरणांचे उत्पादन भारतातच करण्याचे उद्दिष्ट आहे. कुडानकुलम अणुऊर्जा प्रकल्पाच्या दुसऱ्या टप्प्यांसाठीची उपकरणे ह्यामधून पुरविता येतील. महाराष्ट्र शासन या अतिविशिष्ट खंडातील (highly niche segment) अणुऊर्जा यंत्रसामुग्री उपकरणांच्या उत्पादनाला प्रोत्साहन देईल.

**८.१४ खनिज व वन आधारीत उद्योग -**

राज्यात रोजगार निर्मितीस प्रोत्साहन देण्यासाठी उद्योगांमध्ये वन उत्पादनांचा व खनिज उत्पादनांचा वापर /मूल्यवृध्दीस प्रोत्साहन देण्यासाठी विशेषतः वन समृद्ध आणि खनिज समृद्ध क्षेत्रांमध्ये वन उत्पादनांवर, खनिज उत्पादनांवर आधारित उद्योग आणि कृषी उद्योग उभारण्यास /त्यानुषंगाने वृक्षारोपण करण्यास प्रोत्साहन दिले जाईल. सदर प्रोत्साहने केवळ राज्य सरकारच्या अधिकार कक्षेत असलेल्या खनिजांवर आधारीत उद्योगांसाठीच लागू होतील.

सदरहू उद्योग आदिवासी भागात स्थित असल्याने, पायाभूत सुविधांसाठी आदिवासी उप योजना (टीएसपी) च्या निधीचा वापर केला जाईल. याशिवाय प्रोत्साहन कालावधी दरम्यान आदिवासी व्यक्तींना ९०% रोजगार उपलब्ध करुन देणारे गैर आदिवासी उद्योजक / इंडस्ट्रीज प्रोत्साहन सवलतीसाठी पात्र ठरतील. प्रोत्साहन कालावधी उपभोगल्यानंतर आदिवासी व्यक्तींसाठी रोजगाराची टक्केवारी ६०% असेल.

८.१५ राज्याच्या औद्योगिकीकरणास हातभार लावणारे कोणते उद्योग आगामी काळात येतील व कोणत्या उद्योगाच्या क्षेत्रास अभिनव/नाविन्यपूर्ण (niche segment /sunrise sector) असा दर्जा देवून त्यांना थ्रस्ट सेक्टर म्हणून संबोधावे यासाठी व अशा सेक्टरचा समावेश करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या समितीस अधिकार राहतील.

## ९. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम तसेच छोट्या उद्योगांना प्रोत्साहने -

सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम हे राज्याच्या अर्थव्यवस्थेचा कणा आहेत. महाराष्ट्रात ३ दशलक्षाहून अधिक सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम असून त्याची संख्या देशामध्ये सर्वाधिक आहे. देशामध्ये महाराष्ट्रात सर्वात जास्त सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम एकूण रोजगाराच्या ८० टक्क्यांहून अधिक योगदान देतात. स्थानिक साधनसंपत्तीचा वापर करण्यासाठी आणि स्थानिक उद्योजकता व रोजगाराची निर्मिती करण्यासाठी सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम हे सर्वोत्तम माध्यम आहे. सुमारे ४०% निर्यात सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांपासून होते. त्यामुळे सदर उपक्रमांना औद्योगिक विकास व रोजगार निर्मितीसाठी विशेषत: लहान औद्योगिक घटकांसाठी प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने स्थिर भांडवली गुंतवणूकीची (एफसीआय) गुंतवणूकीची मर्यादा ५० कोटी रुपयांपर्यंत वाढविण्यात आली आहे. सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना प्रोत्साहने देण्यासाठी सोबत जोडलेल्या धोरणातील खालील उपाययोजनांना विविक्षीतपणे मान्यता देण्यात येत आहे.

### ९.१ संभाव्य सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे जिल्हानिहाय निर्धारण -

सूक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांच्या उत्पादन संभाव्यतेचा अभ्यास करुन व्यूहरचना निर्धारीत करुन त्याची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासन महाराष्ट्रातील सर्व जिल्हयांमध्ये सर्वेक्षण करुन Geographical Indication (भौगोलिक मापदंड) आधारीत अभ्यास करणार आहे. भौगोलिक मापदंडावर आधारीत उत्पादने ही केवळ आपल्या समृध्द परंपरेचा वारसा नसून ग्रामीण कारागीर यंत्रमाग, शेतकरी अथवा लघु कारागीरांच्या उत्तम कौशल्याचा व बुध्दीमत्तेचा नमुना आहे. अश्या समृध्द परंपरेस जपणे व त्यांना औद्योगिक धोरणात स्थान देणे हे केवळ आपले कर्तव्य नसून मेक इन इंडियाचा भाग राहील. सदर कामगिरी महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाकडे (एमएसएसआयडीसी) सोपविण्यात येईल.

### ९.२ नवीन फ्लॅगशिप योजनेचा शुभारंभ- मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना (CMEGP)

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती योजना (CMEGP) बेरोजगार युवकांसाठी सुरु करेल. बँकेकडून सहज व सोप्या पध्दतीने अर्थसहाय्य देऊन स्थानिक युवकांना स्वयंरोजगाराकडे प्रेरित करणे हे नवीन योजनेचे उद्दिष्ट आहे. सदर योजना उत्पादन व सेवा क्षेत्रातील सर्व घटकांना लागू करण्यात येईल. सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा उद्योग विभाग हे शीर्षस्थ अभिकरण संस्था असेल. योजनेंतर्गत १८ ते ४५ वयातील पात्र व्यक्तींना प्रशिक्षित करुन स्वयंरोजगारासाठी प्रोत्साहित करण्यात येईल व त्यासाठीचे समभाग भांडवल बॅकएंड अनुदानात परिवर्तित करण्यात येईल जे राज्य शासन बँक कर्जाच्या अनुसार देण्यात येईल. प्रकल्प खर्च उत्पादन क्षेत्रासाठी रु.५० लाख व सेवा / व्यवसाय क्षेत्रासाठी रु.१० लाख एवढा मर्यादित असेल. उद्योग संचालनालय व खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत सदर योजनेची अंमलबजावणी उद्योग संचालनालय तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत करण्यात येणार आहे. राज्य शासन यासाठी कार्यक्रमावरील खर्चामधून अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे वित्तीय सहाय्य करण्यात येईल. आवश्यकतेनुसार विशेष घटक योजना

(SCP ) अथवा आदिवासी उपाययोजना (TSP) मधून निधी उपलब्ध केला जाईल. कार्यक्रमाची मुख्य वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत:-

कार्यक्रमाची मुख्य वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत:

अ. स्वयंरोजगारासाठी प्रोत्साहन - धोरण कालावधीत किमान १,००,००० सूक्ष्म उपक्रम.

ब. रोजगाराच्या संधी निर्माण करणे - धोरण कालावधीत किमान १० लाख.

क. युवकांसाठी उद्योजकता विकास कार्यक्रम - धोरण कालावधीत २,००,००० युवक.

ड. अनुदान योजनेद्वारे आर्थिक सहाय्य - मंजूर प्रकल्प खर्चाच्या १५% ते ३५%.

इ. योजनेमध्ये उत्पादन आणि व्यवसाय / सेवा क्षेत्र समाविष्ट आहे.

फ. ग्रामीण आणि निमशहरी अर्थव्यवस्थेला प्रोत्साहन.

## ९.३ सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना संस्थात्मक पाठबळ -

सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना तंत्रज्ञानाचा स्वीकार व प्रसार करणे, बाजारपेठांची चाचपणी करणे, व्यवस्थापन तंत्र इत्यादींसाठी आधाराची आवश्यकता असते. यासाठी राज्य शासन महाराष्ट्रामधील विद्यमान संबंधित संस्थांचे बळकटीकरण करण्यास मदत करेल.

अ. उद्योगासाठी महत्वाच्या असलेल्या तंत्रज्ञानाचा विकास / आत्मसात करणे यासाठी राज्य शासनाकडून "सेंटर ऑफ एक्सलन्स" (सीओई) / संशोधन सुविधांना पाठबळ देण्यात येईल.

ब. "सेंटर ऑफ एक्सलन्स" (सीओई) / संशोधन सुविधांमध्ये प्लग व प्ले इनक्यूबेशन सुविधा असतील आणि समुपदेशनासाठी तसेच प्रशिक्षणासाठी व्यवस्था असेल.

क. क्षेत्रविशिष्ट कौशल्य विकासासाठी आणि नवीन / अद्ययावत तंत्रज्ञान किंवा उत्पादनांचा वापर करण्यासाठी संस्थात्मक सहकार्यासाठी राज्य शासनाचे पाठबळ राहील.

ड. राज्य शासनाकडून नवीन तंत्रज्ञानाबाबत जागरूकता निर्माण करण्यासाठी आणि त्याचा अवलंब करण्याकरिता सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योजकांसाठी संस्थांतर्गत कार्यशाळा आयोजित केल्या जातील.

इ. जागतिक दर्जाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांचे राज्यातील सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांमध्ये परस्पर सहकार्य/सामंज्यासाठी राज्य शासन पुढाकार घेईल.

## ९.४ औद्योगिक समूह प्रवर्तन (क्लस्टर प्रमोशन)

औद्योगिक समूह विकासामध्ये महाराष्ट्र हे देशामधील अग्रेसर राज्य आहे. सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांची स्पर्धात्मकता टिकवून त्यात सुधारणा करण्यासाठी समूह आधारित प्रोत्साहन हे शाश्वत, कमी खर्चिक व सर्वसमावेशक उपाययोजना ठरत असल्याचे निदर्शनास येत आहे.

अ "अ" व "ब" क्षेत्र वगळून राज्यांमधील मंजूर सामायिक सुविधा केंद्रांकरिता आर्थिक प्रोत्साहने राज्य शासनाकडून दिली जातील.

ब समूह विकासासाठी वित्तीय सहाय्याची मर्यादा विद्यमान ५ कोटी रुपयांवरून १० कोटी रुपयांपर्यंत वाढविली जाईल.

क. सदर प्रयोजनार्थ स्थापित विशेष उद्दिष्ट वाहनांना (एसपीव्ही) अर्थसहाय्य पुरविण्यात येईल. राज्यस्तरीय सुकाणूसमिती प्राप्त प्रस्तावांचे मूल्यमापन करुन मंजूरी देईल.

ड. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या नविन औद्योगिक वसाहतींमध्ये २० टक्के क्षेत्रफळ हे, सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी आरक्षित ठेवण्यात येईल. त्यापैकी २० टक्के क्षेत्रफळ हे अनुसूचित जाती / जमाती मधील उद्योजक व ५ टक्के क्षेत्रफळ महिला उद्योजिका व महिला बचत गटांच्या औद्योगिक घटकांसाठी राखीव ठेवण्यात येईल. माजी सैनिकाच्या पुर्नवसनाच्या दृष्टीने त्यांना स्वयंरोजगाराच्या संधी मिळाव्यात यासाठी २ टक्के क्षेत्रफळ राखीव ठेवण्यात येईल.

इ. केंद्र / राज्य सरकारच्या समूह विकास योजनेंतर्गत स्थापित सामायिक सुविधा केंद्र (सीएफसी) औद्योगिक कार्य (इंडस्ट्रियल ॲक्टीव्हीटी) समजले जाईल.

**९.५ सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना सार्वजनिक निधीची सुविधा उपलब्ध करुन देणे.**

राज्यातील अनेक सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांमध्ये मोठ्या प्रमाणावर विस्तार करण्याची क्षमता आहे. तथापि, निधीअभावी त्यांच्या विस्तरीकरणात मर्यादा येत आहेत. त्यांच्यामधील वाढीची क्षमता लक्षात घेऊन २०१२ मध्ये एसएमई एक्सचेंजची स्थापना झाली होती. राज्यात सार्वजनिक निधी उभारण्यात एक्सचेंजचा फायदा झाला आहे. गेल्या आर्थिक वर्षामध्ये एसएमईचे सीएजीआर सुमारे ४०% होते.

सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम आता स्टॉक एक्स्चेंजवर लिस्टींगद्वारे सार्वजनिक निधी प्राप्त करू शकतात. राज्य सरकारने प्रस्तुत औद्योगिक धोरण कालावधी दरम्यान एसएमई एक्सचेंज, मुंबईमध्ये सूचीबद्ध होणाऱ्या महाराष्ट्रातील पहिल्या २५० एसएमईंना आर्थिक सहाय्य प्रदान करून सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना पाठिंबा देण्याचे नियोजिले आहे.

**९.६ सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांची नादारी व कर्जबाजारीच्या समस्यांमधून सोडवणूक करण्यासाठी सल्लागार कक्ष**

सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांच्या नादारी व कर्जबाजारीच्या समस्यांवर त्वरित तोडगा काढण्यासाठी व संबंधित घटकांना मार्गदर्शन करण्यासाठी नादारी व दिवाळखोरी संहिता २०१६ अंतर्गत महाराष्ट्र शासन प्रादेशिक विभागवार कक्ष स्थापन करेल. सदर उद्देशार्थ महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाला बळकट व सक्षम करुन त्यादृष्टीने अधिकार बहाल करण्यात येतील.

**९.७ सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना आर्थिक प्रोत्साहने**

महाराष्ट्र हे देशात सर्वाधिक आकर्षक आर्थिक सवलती देणारे राज्य आहे.

९.७.१ या धोरणाच्या अनुषंगाने, सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांची व्याख्या ही, केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम अधिनियम-२००६ मधील व्याख्येनुसार तसेच ज्या लहान उद्योग घटकांची स्थिर भांडवली गुंतवणूक रु.५० कोटी पर्यंत आहे अशी राहील.

९.७.२ विशिष्ट मर्यादेपेक्षा जास्त नसेल इतकी विशिष्ट प्रोत्साहन रक्कम बास्केट ऑफ इन्सेंटीव्हजव्दारे पात्र सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना देण्यात येईल.

**तक्ता क्र.१ - सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी पात्रता निकष**

<table>
<tr><th></th><th>स्थिर भांडवली गुंतवणुकीची कमाल मर्यादा (रु. कोटी)</th><th>स्थिर भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीच्या प्रमाणात मर्यादा</th><th>पात्रता कालावधी (वर्षे)</th></tr>
<tr><td>अ</td><td rowspan="7">या धोरणाच्या अनुषंगाने , सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमाची व्याख्या ही केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम अधिनियम-२००६ मधील व्याख्येनुसार तसेच ज्या लहान उद्योग घटकांची स्थिर भांडवली गुंतवणूक रु.५० कोटी पर्यंत आहे अशी राहील.</td><td>-</td><td>-</td></tr>
<tr><td>ब</td><td>३०%</td><td>७</td></tr>
<tr><td>क</td><td>४०%</td><td>७</td></tr>
<tr><td>ड</td><td>५०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>ड+</td><td>६०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदूर्ग व धुळे</td><td>८०%</td><td>१०</td></tr>
<tr><td>विना उद्योग जिल्हे, नक्षलग्रस्त जिल्हे* आणि आकांक्षी जिल्हे (एस्पायरेशनल डिस्ट्रीक्टस्) **</td><td>१००%</td><td>१०</td></tr>
<tr><td colspan="4">*महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग.<br>** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (Aspirational Districts).</td></tr>
</table>

९.७.३ कृषी व अन्न प्रक्रिया उद्योग (फक्त द्वितीय व तृतीय प्रक्रिया उद्योग तसेच शेतकरी उत्पादक कंपन्यांना उत्पादन व प्रक्रिया प्रयोजनार्थ) हरित ऊर्जा / जैव इंधन व उद्योग ४.० मधील पात्र सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना अतिरिक्त सहाय्य देण्यात येईल.

९.७.४ (अ वर्ग विभाग वगळून ) विदर्भ, मराठवाडा, उत्तर महाराष्ट्र, नक्षली प्रभावित विभाग, महत्वाकांक्षी जिल्हे व रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे ह्या जिल्ह्यांमधील नवीन पात्र सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना वीज शुल्कातील सवलत ही वापरलेल्या विजेवर रु १/-प्रति युनिट व (अ वर्गवारी वगळून) अन्य विभागांसाठी रु ०.५० प्रति युनिट इतकी वीज शुल्कातील सवलत घटकाचे व्यापारी उत्पादन सुरु झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षे कालावधी पर्यंत वापरलेल्या विजेच्या प्रमाणात मर्यादित असेल.

९.७.५ "अ" वर्गवारी विभागातील उद्योग सोडून इतर विभागातील पात्र उपक्रमांना त्यांनी वर्षभरात वापरलेल्या विजेच्या आणि भरणा केलेल्या वीजदेयकाच्या प्रमाणात प्रति वर्ष ५% व्याज सवलत अनुज्ञेय असेल.

९.७.६ उपरोक्त सूचीबद्ध सवलतीच्या व्यतिरिक्त, पात्र सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांना गुंतवणुकीच्या कालावधीत जमीन संपादित करण्यासाठी (भाडेपट्टा करार व विक्री प्रमाणपत्र समाविष्ट ) व त्यापोटी मुदत कर्जावरील मुद्रांक शुल्कात १००% सवलत अनुज्ञेय असेल. मात्र “अ” व “ब”विभागात सदर सवलत ही माहिती तंत्रज्ञान व जीवतंत्रज्ञान उद्यानातील माहिती तंत्रज्ञान व अनुषंगिक उद्योगांना व जीवतंत्रज्ञान एककांनाच देऊ करण्यात येईल. सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अंतर्गत पात्र उद्योग घटक देखील त्यांच्या गुंतवणूक कालावधीकरिता मुद्रांक शुल्क सवलत मिळणेकरिता पात्र असतील.

९.७.७ क, ड, ड+ विभाग, शून्य उद्योग व नक्षली प्रभावित विभाग व महत्वाकांक्षी जिल्ह्यांमधील पात्र मध्यम, लघु व सूक्ष्म उपक्रमांना औद्योगिक प्रोत्साहन अनुदानाच्या पात्रता कालावधी इतक्या कालावधीपर्यंत वीजशुल्क भरणा करण्यापासून सूट असेल. “अ” व “ब” विभागातील १०० टक्के निर्याताभिमुख सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना माहिती तंत्रज्ञान व जैवतंत्रज्ञान क्षेत्रातील सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना सात वर्षे कालावधी पर्यंत वीज शुल्कात १००% सवलत देऊ करण्यात येईल.

९.७.८ केंद्र शासन व राज्य शासन यांच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी असलेल्या सर्व योजना या धोरणाशी संलग्न करण्यात येतील.

९.७.९ सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांच्या विपणन कार्यास पाठबळ देण्यासाठी विपणन सहाय्य योजना तयार केली जाईल. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावरील सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना विपणनातील स्पर्धात्मकतेत सुधारणा करण्यासाठी अनुसूचित जाती /जमाती महिला उद्योजकांना आर्थिक सहाय्य दिले जाईल आणि राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय मेळाव्यांमध्ये सहभाग घेण्यासाठी प्रोत्साहीत केले जाईल.

९.७.१० सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे सक्षमीकरण करण्यासाठी तसेच गुणवत्तेतील स्पर्धात्मकता, झिरो डिफेक्ट झिरो इफेक्ट (ZED Scheme), संशोधन व विकास, तंत्रज्ञानातील अद्ययावतीकरण, पाणी व वीज संवर्धन, स्वच्छ उत्पादन उपाययोजना व पतमानांकन यासाठी प्रोत्साहित करण्याकरिता, स्वतंत्र प्रोत्साहने (सामुहिक प्रोत्साहन योजनेतील प्रोत्साहनांव्यतिरिक्त) अनुज्ञेय असतील.

९.७.११ पात्र सुक्ष्म,लघु व मध्यम उद्योग घटकांना देण्यात येणारे औद्योगिक विकास अनुदान हे घटकाने पात्र उत्पादनांच्या प्रथम विक्रीवर जी राज्यातील एकाच एंन्टीटिस बिल्ड(Billed) व डिलिव्हर केलेली असेल त्यावर भरलेल्या एकूण (Gross) राज्य वस्तू व सेवा करावर (एसजीएसटी) आधारित असेल.

## १०. मोठ्या, विशाल व अतिविशाल प्रकल्पांमध्ये गुंतवणूक आकर्षित करणे.

महाराष्ट्र देशात सर्वात जास्त मोठे व विशाल प्रकल्प आहेत. राज्याला मोठया, विशाल व अतिविशाल प्रकल्पांमुळे मोठया प्रमाणावर महसूल आणि रोजगार निर्मितीचा लाभ झालेला आहे हे सर्वज्ञात आहे. यापुढेही या गोष्टीचा लाभ घेऊन प्रादेशिकरित्या संतुलित व सर्वसमावेशक विकास साधण्याकरीता या धोरणामध्ये एकत्रित प्रयत्न केले आहेत.

### १०.१ मोठे उद्योग

१०.१.१ मोठया उद्योगांची व्याख्या ही जे औद्योगिक घटक स्थिर भांडवली गुंतवणूक किंवा प्रत्यक्ष रोजगार यांची किमान मर्यादे खाली नमूद तक्त्याप्रमाणे पार पाडतील त्यांना मोठे उद्योग संबोधले जाईल. मोठ्या उद्योगांना देण्यात येणारे अर्थसहाय्य अशाप्रकारे देण्यात येतील जेणेकरुन जास्तीत जास्त उद्योग राज्याच्या अविकसित भागांमध्ये स्थापन होतील. मोठ्या उद्योगांना देण्यात येणारी आर्थिक प्रोत्साहने ही त्यांच्या बास्केट ऑफ इन्सेंटिव्हज मधील एकूण रकमेच्या मर्यादेपेक्षा जास्त नसतील.

**तक्ता २ - मोठ्या उद्योगांसाठी पात्रतेचे निकष**

| तालुका / विभाग वर्गवारी | स्थिर भांडवली गुंतवणुकीची किमान मर्यादा (रु. कोटी) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (संख्या) |
|---|---|---|
| अ व ब | ७५० | १००० |
| क | ५०० | ७५० |
| ड | २५० | ५०० |
| ड+ | १५० | ४०० |
| विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, धुळे | १०० | ३०० |
| विना उद्योग जिल्हे, नक्षलग्रस्त जिल्हे* आणि आकांक्षी जिल्हे | १०० | २५० |
| *महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग. ** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (एस्पायरेशनल डिस्ट्रीक्टस्). | | |

**टिप :-** राज्यातील सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांसाठी असलेल्या रु. ५० कोटी या स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या कमाल मर्यादेपेक्षा जास्त परंतु वरील तक्ता क्र.२ मध्ये विहित केलेल्या मोठया उद्योगांसाठीच्या किमान गुंतवणूक मर्यादेपर्यंत स्थिर भांडवली गुंतवणूक असलेल्या पात्र उद्योग घटकांना ४० टक्के मर्यादेपर्यंत राज्यातील प्रथम विक्रीवर देय राज्य वस्तू व सेवा करावर (SGST) औद्योगिक विकास अनुदान अनुज्ञेय राहील. मात्र "अ"तसेच "ब" वर्गवारीसाठी ही प्रोत्साहने लागू राहणार नाहीत.

अ. थ्रस्ट सेक्टरमधील मोठ्या उद्योगांना अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात येतील.

ब. पात्र मोठया उद्योग घटकांना देण्यात येणारे औद्योगिक विकास अनुदान हे घटकाने पात्र उत्पादनांच्या प्रथम विक्रीवर जी राज्यातील एकाच एंन्टीटिस बिल्ड (Billed) व डिलिव्हर केलेली असेल त्यावर भरलेल्या एकूण (Gross) राज्य वस्तू व सेवा करावर (एसजीएसटी) आधारित असेल. "प्रथम येणाऱ्यास प्रथम सेवा" आधारावर मोठ्या घटकांना प्रोत्साहने दिली जातील.

क. उपरोक्त सूचीबद्ध सवलतीच्या व्यतिरिक्त, पात्र मोठया उद्योगांना गुंतवणुकीच्या कालावधीत जमीन संपादित करण्यासाठी (भाडेपट्टा करार व विक्री प्रमाणपत्र समाविष्ट) व त्यापोटी मुदत कर्जावरील मुद्रांक शुल्कात १००% सवलत अनुज्ञेय असेल. मात्र अ व ब विभागात सदर

सवलत ही माहिती तंत्रज्ञान व जीवतंत्रज्ञान उद्यानातील माहिती तंत्रज्ञान व अनुषंगिक उद्योगांना व जैवतंत्रज्ञान एककांनाच देऊ करण्यात येईल. सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१३ अंतर्गत पात्र उद्योग घटक देखील त्यांच्या गुंतवणूक कालावधीकरिता मुद्रांक शुल्क सवलत मिळणेकरिता पात्र असतील.

ड. क, ड, ड+ विभाग, शून्य उद्योग व नक्षली प्रभावित विभाग व महत्वाकांक्षी जिल्ह्यांमधील पात्र मोठया उद्योगांना औद्योगिक प्रोत्साहन अनुदानाच्या पात्रता कालावधी इतक्या कालावधीपर्यंत वीजशुल्क भरणा करण्यापासून सूट असेल. “अ” व “ब” विभागातील १०० टक्के निर्याताभिमुख मोठया उद्योगांना माहिती तंत्रज्ञान व जैवतंत्रज्ञान क्षेत्रातील सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना सात वर्षे कालावधी पर्यंत वीज शुल्कात १००% सवलत देऊ करण्यात येईल.

इ. धोरणाच्या पहिल्या वर्षात प्रोत्साहनांसाठी अर्ज करणाऱ्या पात्र घटकांना संबंधित प्रादेशिक विभाग व घटकाच्या स्थानानुसार प्रोत्साहनांचे पूर्ण बास्केट ऑफ इन्सेंटीव्हज दिले जातील. घटकाने धोरण कालावधीमध्ये दुसऱ्या अथवा त्यानंतरच्या वर्षांमध्ये अर्ज केल्यास प्रत्येक वर्षासाठी ५% इतके बास्केट ऑफ इन्सेंटीव्हज कमी केले जातील. ही तरतुद थ्रस्ट क्षेत्रांमधील उद्योगांना लागू होणार नाही.

फ. पात्र मोठे कृषी व अन्न प्रक्रिया उद्योग (द्वितीय आणि त्रितीय प्रक्रिया करणारे घटक आणि शेतकरी उत्पादक कंपन्यांच्या बाबतीत फक्त उत्पादन / प्रक्रिया प्रयोजनार्थ ), हरित उर्जा जैविक इंधन आणि इंडस्ट्री ४.० या क्षेत्रातील मोठया उद्योगांना अधिकचे सहाय्य देण्यात येईल.

ग. राज्य सरकारच्या विविध विभागांनी किंवा एजन्सींनी पुरवलेल्या एकूण आर्थिक प्रोत्साहनांमध्ये राज्य सरकारद्वारे परिभाषित केलेल्या औद्योगिक प्रोत्साहन अनुदान (आयपीएस) मर्यादेपेक्षा (स्थिर भांडवली गुंतवणुकीच्या टक्केवारीपेक्षा) जास्त नसावे.

ह. गुणवत्ता स्पर्धात्मकता, संशोधन आणि विकास, तंत्रज्ञान वृध्दी, जल आणि ऊर्जा संधारण, स्वच्छ उत्पादन उपायांचे आणि क्रेडिट रेटिंगचे प्रोत्साहन देण्यासाठी मोठ्या घटकांना प्रोत्साहन दिले जाईल.

## १०.२ विशाल व अतिविशाल प्रकल्प

१०.२.१ खालील तक्त्यात नमूद स्थिर भांडवली गुंतवणूक किंवा प्रत्यक्ष रोजगाराच्या किमान मर्यादा पूर्ण करणाऱ्या उद्योगांना विशाल / अतिविशाल प्रकल्प म्हणून वर्गीकृत करण्यात येईल.

**तक्ता ३ - विशाल व अतिविशाल उद्योगांना सवलतींचे वितरण करण्यासाठी पात्रता निकष**

| उद्योगाचा प्रकार | तालुका / विभाग वर्गवारी | स्थिर भांडवली गुंतवणुकीची किमान मर्यादा (रु. कोटी) | किमान प्रत्यक्ष रोजगार निर्मिती (व्यक्तींची संख्या) |
|---|---|---|---|
| विशाल प्रकल्प | अ व ब | १५०० | २००० |
| | क | १००० | १५०० |
| | ड | ७५० | १००० |
| | ड+ | ५०० | ७५० |
| | विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग व धुळे | ३५० | ५०० |
| | विना उद्योग जिल्हे, नक्षली प्रभावित विभाग* व आकांक्षी जिल्हे** | २०० | ३५० |
| अतिविशाल प्रकल्प | संपूर्ण राज्यासाठी | ४००० | ४००० |

*महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दिनांक १ एप्रिल २०१३ रोजीच्या शासन निर्णय क्र. पीएसआय -२०१३ / (सीआर -५४) / उद्योग -८ नुसार नक्षलग्रस्त भाग.
** उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार असे आकांक्षी जिल्हे (Aspirational Districts).

अशी तरतूद करण्यात येते की,

अ) रोजगाराच्या निकषानुसार अतिविशाल / विशाल उद्योगांना अर्हताधारक रोजगारांना संपूर्ण वर्षभर आपल्या हजेरीपटावर प्रत्यक्ष रोजगारीत म्हणून ठेवावे लागेल. वर्षाच्या कोणत्याही कालावधीत रोजगाराचा निकष पूर्ण न केल्यास, त्या वर्षासाठी औद्योगिक प्रोत्साहन सहाय्य अनुज्ञेय असणार नाही.

ब) उपरोक्त तक्त्यात नमूद विहित किमान प्रत्यक्ष रोजगार हा व्यापारी उत्पादन सुरु झाल्याच्या दिनांकापासून ३ वर्षाच्या कालावधीत निर्माण करणे आवश्यक आहे.

क) कॅप्टिव्ह ऊर्जा प्रकल्पासाठी केलेली गुंतवणूक ही विशाल / अतिविशाल प्रकल्प म्हणून पात्रतेचा विचार होण्यासाठीच्या निकषासाठी विचारात घेतली जाणार नाही.

ड) १००% कॅप्टिव्ह प्रोसेस वेंडर गुंतवणूक ही अनुज्ञेय स्थिर भांडवली गुंतवणूकीचा भाग म्हणून विचारात घेता येईल. मात्र कॅपटीव्ह प्रोसेस वेंडर गुंतवणूक ही विशाल / अतिविशाल प्रकल्प म्हणून पात्रतेचा विचार होण्यासाठीच्या निकषासाठी विचारात घेतली जाणार नाही.

इ) विशाल/अतिविशाल प्रकल्पांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ क्षेत्रामध्ये प्राधान्याने जमीन उपलब्ध करुन देण्याचे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाचे प्रचलित धोरण यापुढे देखील सुरु राहील.

१०.२.२ शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००५/प्र.क्र.११९/उ-८, दिनांक ०२ जून, २००५ अन्वये मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली उच्चाधिकार समिती विशाल व अति विशाल प्रकल्पांना द्यावयाच्या प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना (customized package) मान्यता देईल. शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१०९७/(१३४७८)/उ-८, दिनांक १८ जानेवारी, १९९८ अन्वये स्थापन करण्यात आलेली व शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००४/प्र.क्र.३१८/उ-८, दिनांक २४ डिसेंबर, २००४ अन्वये पुनर्रचित करण्यात आलेली मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील उद्योगांकरिता मंत्रीमंडळ उप समिती विशाल व अतिविशाल प्रकल्पांसाठी प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना (customized package) देण्यात मंजूरी देईल.

१०.२.३ राज्यातील रू.५०० कोटीपेक्षा जास्त स्थिर भांडवली गुंतवणुक असलेल्या मोठे विशाल व अतिविशाल प्रकल्पांमध्ये राज्य शासनाची महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणामार्फत ९% समभाग भागीदारी असेल. ही भागीदारी औद्योगिक धोरण-२०१९ ते २०२४ या धोरणांतर्गत सदर प्रकल्पांना मिळालेल्या प्रोत्साहनांच्या बदली स्वरुपात असेल. इक्विटी भागीदारी ही केवळ “समभागाच्या” स्वरुपात असेल. समभाग व लाभांश हे महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण यांच्या नावाने निर्गमित करण्यात येतील. जर राज्य शासनाला त्यांच्या समभागांची विक्री करावयाची असेल तर केवळ चालू बाजार भावाप्रमाणे त्याची विक्री करण्यात येईल याविषयी प्रथम नकार देण्याचा अधिकार संबंधित औद्योगिक घटकाच्या प्रवर्तकाचा असेल. ज्यामुळे व्यावसायिक स्पर्धा/ईर्षा/व्यावसायिक विरोधामुळे होणारे अधिग्रहण टळेल.

१०.२.४ राज्य सरकारकडून सामूहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत प्रोत्साहन मिळविणा-या विशाल व अतिविशाल प्रकल्पांना राज्य सरकारद्वारे विहित करण्यात आलेल्या स्थानिक लोकांना रोजगार धोरणा प्रमाणे रोजगार पुरवणे आवश्यक राहिल. तसे न केल्यास देऊ केलेल्या प्रोत्साहनांमध्ये घट होईल.

१०.२.५ अतिमहत्वाच्या प्रकल्पांकरिता (विशाल किंवा अतिविशाल प्रकल्प असलेले किंवा नसलेले) शासन प्रकरणनिहाय विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांना (customized package) मान्यता देईल. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली उच्चाधिकार समिती अशा प्रकल्पांना द्यावयाच्या विवक्षित एकत्रित प्रोत्साहनांची (customized package) शिफारस मंत्रिमंडळ उपसमिती कडे करेल.

- ❖ राज्यातील सूक्ष्म, लघु , मध्यम, मोठे, विशाल व अतिविशाल उद्योगांना सामूहिक प्रोत्साहन योजनेव्यतिरिक्त राज्य शासनाच्या अन्य विभागाकडून प्रोत्साहने / सवलती दिल्या जातात, (उदा. सूत गिरण्या) उद्योग घटकांस सर्व स्रोतामार्फत देण्यात येणारा आर्थिक परतावा / प्रोत्साहने घटकाने केलेल्या एकूण स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या १०० टक्केच्या मर्यादेतच अनुज्ञेय राहील.

**११. हरित औद्योगिकीकरणास सहाय्य**

महाराष्ट्र हे शाश्वत विकासासाठी पुढाकार घेणारे अग्रगण्य राज्य आहे आणि ते हरित औद्योगिकीकरणास प्रोत्साहन देते, ज्यामुळे पर्यावरणावरील प्रतिकूल प्रभाव कमी होईल.

अ पात्र उद्योगांना पाणी, ऊर्जा व पर्यावरण यांचे संवर्धन करण्याची प्रक्रिया हाती घेण्यासाठी हरित औद्योगिकीकरण सहाय्य देण्यात येईल. कचरा व्यवस्थापन प्रणाली (सांडपाणी व मैला प्रक्रिया संयंत्रे समाविष्ट), प्रदूषण नियंत्रण प्रणाली / उपकरणे, आरोग्य व सुरक्षितता प्रणाली / उपकरणे, पाणी संवर्धन / साठवण प्रणाली / उपकरणे व कॅपटीव्ह नविनीकरणीय ऊर्जा निर्मिती संयंत्र हे प्रकल्प योजनेत समाविष्ट असतील. केंद्र शासन तसेच राज्य शासनाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडून प्राप्त अनुदान/अर्थसहाय्य अनुदाने दिली जातील. विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील समिती सदर सवलतींना मंजुरी देईल.

ब कॅप्टिव्ह सौर ऊर्जा निर्मिती संयंत्र हे भांडवली गुंतवणुकीतील सवलतीसाठी अनुज्ञेय समजण्यात येईल. या संयंत्रातून उत्पादित झालेली किमान ८०% वीज त्याच एककाकडून वापरण्यात येते, त्यास कॅप्टिव्ह सौर ऊर्जा संयंत्र मानता येईल.

**१२. संशोधन व विकसनाला प्रोत्साहन देणे (R & D)**

संशोधन व विकास हे एखाद्या क्षेत्राची उत्पादकता आणि आर्थिक प्रगती करण्यासाठी महत्त्वपूर्ण आहे. भक्कम संशोधन व विकास पायाभूत सोयी सुविधा ही शाश्वत विकासासाठी थेट योगदान देते आणि वैज्ञानिक समुदायासाठी रोजगाराच्या नव्याने संधी निर्माण करते.

भारतासारख्या देशात बौद्धिक संपत्तीची उच्च क्षमता आहे. ब्रेन ड्रेन टाळण्यासाठी आणि विद्यमान प्रतिभेचा पुरेपुर वापर करणेसाठी औद्योगिक संशोधन करण्याची विशेष गरज आहे. संशोधकांच्या बौद्धिक संपत्ती अधिकारांचे संरक्षण करणे देखील तेवढेच महत्वाचे आहे. संशोधन व विकासास प्रोत्साहन देण्यासाठी पुढील पुढाकार घेण्यात येणार आहेत.

अ पात्र औद्योगिक घटकाच्या संशोधन व विकासामधील स्टँड अलोन/एकत्र सुविधांना आर्थिक प्रोत्साहन मिळविण्यासाठी स्थिर भांडवल गुंतवणुकीचा भाग समजण्यात येईल.

ब औद्योगिक संशोधन व विकसन उपक्रमांना पाठबळ देण्यासाठी विशेष निधीची तरतूद करण्यात येईल.

क उद्योगाद्वारे प्रोत्साहन आणि विद्यापीठांमध्ये उत्कृष्टता केंद्र, तांत्रिक संस्था इत्यादी उच्च तांत्रिक शिक्षण व विद्यापीठ इत्यादींसारख्या संबंधित विभागांचे योगदान विचारात घेतले जाईल. विद्यापीठे, सेंटर ऑफ एक्सलंन्स, तंत्रज्ञान संस्था इत्यादींमार्फत शैक्षणिक संस्था व उद्योग यांच्यामध्ये दुवा साधण्यास प्रोत्साहित करण्यात येईल.

ड औद्योगिक उपक्रम, घटक व खाजगी व्यक्ती यांना उत्पादन क्षेत्राशी निगडीत स्वामित्व हक्क (पेटंट) नोंदणीसाठी आर्थिक सहाय्य मिळण्यास पात्र असतील.

इ नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाचा सहभाग लक्षात घेता, संयुक्त उपक्रम राबविणाऱ्या संशोधन व विकास घटकांना देखील आर्थिक सहाय्य दिले जाईल.

## १३. स्टार्टअप्ससाठी वातावरण निर्मितीस चालना

नवीन औद्योगिक धोरणांमुळे नाविन्यपूर्ण स्टार्टअप्सना आवश्यक पायाभूत सुविधा प्रदान करून नवउद्योजकांना पूरक वातावरण निर्माण करण्यासाठी धोरणाचा भाग म्हणून राज्य शासन पाठबळ देईल. नवउद्योजकांना आर्थिक सहाय्य, समुपदेशन देऊन मदत केली जाईल व त्यांच्या कल्पनांचे आदानप्रदान करणेसाठी पुरेश्या उपाययोजना केल्या जातील.

सरकार, उद्योग आणि शैक्षणिक संस्था यांच्यातील समन्वयाने महाविद्यालयीन स्तरापासून स्टार्टअप्सना प्रोत्साहीत करण्यासाठी योग्य ती पावले उचलली जातील. उदयोन्मुख तंत्रज्ञानावर आधारीत स्टार्टअप जसे की कृत्रिम बुद्धिमत्ता, रोबोटिक्स, इंटरनेट ऑफ थिंग्स, नॅनो टेक्नोलॉजी इत्यादींना उद्योग / व्यवसायातील समुपदेशक पुरविले जातील. राज्य सर्वसाधारणपणे खुल्या प्रवर्गातील आणि अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती प्रवर्गातील व महिला उद्योजकांसाठी स्टार्टअप्ससाठी इनक्यूबेटरर्सची स्थापना आणि प्रोत्साहन देईल. जागतिक दर्जाच्या विद्यापीठांच्या सहकार्याने इनक्यूबेटरर्सची स्थापना करण्यात येईल व त्यांना आवश्यक आर्थिक आणि प्रशासकीय सहाय्य देवून प्रोत्साहित केले जाईल.

## १४. बंद घटकांच्या मालमत्तेची सोडवणूक / पुनरुज्जीवन

मेक इन इंडिया व मॅग्नेटिक महाराष्ट्र असे कार्यक्रम आयोजित करण्यासाठी घेतलेल्या पुढाकारांमुळे राज्यात मागील काही वर्षांमध्ये येत असलेल्या गुंतवणुकीचा ओघ व पुढील ५ वर्षामध्ये रु.१० लाख कोटी गुंतवणुकीच्या लक्ष्याचा विचार करता, त्या गुंतवणूकी प्रत्यक्षात येण्यासाठी राज्यात पुरेश्या जमिनीची उपलब्धता आवश्यक आहे. विशेषत: राज्याच्या विकसित भागांमध्ये जमीनीची उपलब्धता दुरापास्त झाली आहे. या बाबींचा विचार करुन शासन उद्योगांना अविकसित भागात गुंतवणूक करण्यासाठी आर्थिक सवलती देऊ करत आहे. त्याशिवाय बंद झालेल्या किंवा अव्यवहार्य ठरलेल्या उद्योगांच्या जमिनींचा सुध्दा उपयोग करण्याचे राज्याचे प्रयोजन आहे.

शासकीय देणी व त्यावरील शास्ती, वित्तीय संस्थांची देणी, कामगारांची देणी व त्यांचे प्रश्न व सदर जमिनींची विल्हेवाट लावण्याची कंपन्यांची उदासीनता हे अव्यवहार्य / बंद पडलेल्या औद्योगिक उपक्रमाच्या जमिनी सोडविण्यातील प्रमुख अडथळा ठरत आहे. यासाठी खालील धोरणात्मक उपाययोजनांच्या द्वारे सदर समस्या सोडविण्याचे राज्य शासनाने निश्चित केले आहे.

## १४.१ विशेष अभय योजना

अ सर्व बंद व अव्यवहार्य ठरलेल्या उद्योगांच्या शासकीय देणी व शास्तींच्यासाठी राज्य शासन विशेष अभय योजना आणणार असून त्यामध्ये सर्व (शासकीय अभिकरणे समाविष्ट) शासकीय देण्याच्या मुद्दलाची एकरकमी परतफेड करुन त्यावरील व्याज आणि / किंवा शास्ती पूर्णपणे माफ करण्यात येईल. सदर माफी योजना मर्यादित कालावधीसाठी कार्यान्वित असेल. तसेच सदर उद्योगांची शासकीय देणी प्रदर्शित करणारे ऑनलाईन संकेतस्थळ त्यासाठी कार्यान्वित करण्यात येईल.

ब सर्व वित्तसंस्थांची देणी (महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळासहित) परतफेड करणे, हे भारतीय रिझर्व्ह बँकेच्या दिशानिर्देशांच्या अधीन असेल. मात्र सदर देणी लवकरात लवकर परतफेड होण्यासाठी राज्य शासन वित्तीय संस्थांशी समन्वय साधेल.

क महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ एक आकर्षक एकरकमी परतफेड योजना (OTS) जाहीर करेल.

## १४.२ बंद पडलेल्या औद्योगिक उपक्रमांच्या जमिनी मुक्त करणेबाबत

अ सदर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी जे बंद उद्योग गेली ५ वर्षे बंद असतील आणि ज्यांच्याकडे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रामध्ये २०,००० चौ.मी. एवढी सलग (Contigious) जमीन उपलब्ध असेल अशा घटकांना औद्योगिक समूह उभारण्याची अनुमती असेल.

ब सदर जमिनीचा पुर्नवापर होण्यासाठी विशेष पुढाकार घेण्यात येईल. औद्योगिक जमिनीचा वापर हा ६०:४० या प्रमाणात असेल म्हणजेच ६० टक्के औद्योगिक व ४० टक्के पूरक सेवा हे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या क्षेत्रात अनुज्ञेय राहील.

क सदर जागेचा विकास होण्याच्या उद्दिष्टाने नॉन फिसकल प्रोत्साहने दिल्याशिवाय विकासक पुढे येणार नाही. सबब अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक किती द्यावा, तसेच आकारणी करावयाचे अधिमूल्य, यासह अन्य बाबींसंदर्भात निकष तयार करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली ४ सदस्यांची समिती नेमण्यात येत आहे. यामध्ये सचिव (नवि-१), सचिव (वित्त/व्यय), विकास आयुक्त (उद्योग) व मुख्य कार्यकारी अधिकारी (म.औ. वि. म.) यांचा समावेश असेल.

ड पुर्नविकसन प्रकल्पाची सत्वर अंमलबजावणी होण्यासाठी चटई क्षेत्र निर्देशांकाची सवलत मर्यादित कालावधीसाठीच देण्यात येईल. पुर्नविकसन प्रकल्प हे ७ वर्षांच्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे.

## १५. वॉक टू वर्क संकल्पना

अ "वॉक टू वर्क" संकल्पनेला चालना देऊन शहरातील गर्दी कमी करण्यासाठी, राज्यात सॅटेलाईट कार्यालयांना विकसित केले जाईल. कामाच्या ठिकाणापासून ५ किमी परिसरामध्ये कर्मचाऱ्यांसाठी निवासी सुविधा विकसित करण्यासाठी उद्योगांना प्रोत्साहीत केले जाईल.

ब महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ अशा क्षेत्रांसाठी नियोजन प्राधिकरण असेल आणि इतर सरकारी यंत्रणा विकासासाठी सहभागी होतील. सदर जागेचा विकास होण्याच्या उद्दिष्टाने नॉन फिसकल प्रोत्साहने दिल्याशिवाय विकासक पुढे येणार नाही. सबब अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक किती द्यावा, तसेच आकारणी करावयाचे अधिमूल्य, यासह अन्य बाबींसंदर्भात निकष तयार करण्यासाठी सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली ४ सदस्यांची समिती नेमण्यात येत आहे. यामध्ये सचिव (नवि-१), सचिव (वित्त/व्यय), विकास आयुक्त (उद्योग) व मुख्य कार्यकारी अधिकारी (म.औ. वि. म.) यांचा समावेश असेल.

क निवासी क्षेत्रात, चित्रपटगृहे, सार्वजनिक सभागृह आणि मल्टीप्लेक्स, रुग्णालये, नर्सिंग होम, शाळा आणि महाविद्यालये, प्रशिक्षण संस्था आणि त्यांच्याशी संबंधित वसतिगृहे यासारख्या व्यावसायिक प्रयोजनांना परवानगी दिली जाईल. केवळ प्रदूषण रहीत उद्योगांना व सेवा क्षेत्रास परवानगी दिली जाईल.

ड. जर विकासक उपरोक्त निकषांचे पालन करीत नसेल तर त्यास भविष्यात (Congestion Tax) कन्जेशन टॅक्स कर लागू केला जाऊ शकतो.

## १६. राज्यात व्यवसाय सुलभता आणणे

व्यवसायासाठी स्पष्ट, वेगवान व जाच-मुक्त नियम करुन व्यवसाय करणे सोपे (ईओडीबी) असल्याचे निदर्शक आहे. सुलभ व्यवसाय वातावरण तयार करण्याकरीता खालील उल्लेखित केलेल्या बाबींचा अंर्तभाव करण्यात येत आहे.

### १६.१ महाराष्ट्र उद्योग, व्यापार व गुंतवणूक कक्ष (मैत्री) सबलीकरण करणे

व्यवसाय सुलभ करण्यासाठी मैत्री हा राज्य सरकारचे एक पाऊल आहे. सुरुवातीपासूनच असंख्य उपक्रमांना मंजुरी / परवानग्या / परवाना मंजूर करण्यात ते प्रभावी ठरले आहे. मैत्रीने सरकारची भूमिका नियमन कर्त्याकडून (रेग्युलेटर) सुकर कर्त्याची (फॅसिलिटेटर) म्हणून बदलली आहे. व्यवसाय, व्यापार आणि वाणिज्य क्षेत्रात नवीन संधी विचारात घेता उद्योग, व्यापार आणि वाणिज्य क्षेत्रास प्रोत्साहन देण्यासाठी सरकारने घेतलेल्या पुढाकारांच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता मैत्रीला स्वायत्त दर्जा देण्यात येईल.

जागतिक गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी मैत्रीची कार्यकक्षा देखील वाढविली जाईल. एक स्वायत्त संस्था म्हणून मैत्री ही राष्ट्रीय व जागतिक व्यासपीठावर महाराष्ट्राचे प्रतिनिधित्व करेल. विविध समिट, मेळावे, प्रदर्शने, रस्ते शो इत्यादी आयोजित करुन तसेच त्यामध्ये सहभागी होऊन मैत्री ही राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय उद्योग संघटना / मंचांसह एकत्रितपणे काम करेल. हे ब्रँड “मॅग्नेटीक महाराष्ट्राच्या” प्रचारासाठी एक व्यासपीठ असेल.

अ. महाराष्ट्रामध्ये उद्योग स्थापन व परिचालित करण्यासाठी आवश्यक त्या राज्य शासनाशी संबंधित सर्व सेवा, परवानगी व संमत्या मैत्री संकेतस्थळाद्वारे देण्यात येतील. सदर मैत्री संकेतस्थळावर राज्याचे स्त्रोत, पायाभूत औद्योगिक सुविधा, उद्योग स्थापन करण्याची प्रक्रिया, तक्रारींचे निराकरण व नियम / शासन विनियम / आदेश इत्यादी बाबतची माहिती उपलब्ध असेल.

ब. विनिर्दिष्ट कालावधीत सर्व सेवा व मंजुऱ्या प्रदान करण्यासाठी मैत्रीस वैधानिक मार्गाने व शक्ती प्रदान करुन सक्षम केले जाईल. गुंतवणूकदारांना वेळेत मंजूरी आणि सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी मैत्रीला अधिक स्वायत्ता देण्यात येईल. प्रारंभिक निधीचे योगदान हे संबधित विभाग/मंडळे/महामंडळे/प्राधिकारी उदा. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, महाराष्ट्र गृह निर्माण व क्षेत्र विकास महामंडळ (म्हाडा), शहर औद्योगिक विकास महामंडळ मर्यादीत (सिडको) इत्यादी मार्फत अदा करण्यात येईल.

क मैत्री कक्ष ईज ऑफ डुइंग बिझनेसच्या पुढाकारासाठी औद्योगिक संघटनांसोबत समन्वय साधेल.

ड मैत्री सुविधा आणि हँडहोल्डिंग सेटअप अधिक प्रभावी होण्यासाठी, विभागीय पातळीवर देखिल मैत्री कक्ष कार्यान्वित केले जातील. मैत्री स्तरावर प्राप्त होणाऱ्या तक्रारी बाबतचा खर्च संबंधीत विभागाकडून करण्यात येईल.

इ विकास आयुक्त (उद्योग) हे याबाबत येणाऱ्या अडचणी लक्षात घेतील व ते कायदेशीर प्रक्रिया राबविण्यासाठी प्राधिकारी असतील.

फ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व महिला उद्योजक प्रवर्गातील उद्योजकतेला प्रोत्साहन देण्यासाठी/मार्गदर्शनासाठी विशेष सहाय्यता कक्ष मैत्री कक्षात स्थापन करण्यात येईल. सदर कक्षासाठी आवश्यक प्रशासकीय खर्चाची पूर्तता सामाजिक न्याय विभाग तसेच आदिवासी विकास विभाग यांचेमार्फत संयुक्तपणे करण्यात येईल.

## १६.२ नियामक सुलभीकरण

अ. पर्यावरण विषयक मंजूरी प्राप्त करण्याच्या प्रक्रियेत सुलभता आणण्यात येईल.

ब. उद्योगांसाठी इमारत बांधकाम आराखडा मंजूर करण्याची प्रक्रिया राज्यभरात एकसारखी तर्कसंगत करण्यात येईल.

क. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे क्षेत्र वगळता १० एकरपेक्षा जास्त क्षेत्रफळ असणाऱ्या औद्योगिक क्षेत्रासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित करण्यात येईल.

ड. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्रामध्ये फक्त महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कराच्या प्रयोजनासाठी आंतरमाध्यम (इंटरफेस) म्हणून काम करेल.

इ. राज्याच्या सेवा अधिनियम कायद्यांतर्गत मैत्री कक्षाला अपिलीय अधिकार देण्यात येतील. तसेच मैत्री कक्षाच्या प्रभावी कामकाजासाठी स्वतंत्र कायदा करुन अधिकार प्रदान केले जातील.

## १७. व्यापार व वाणिज्यासाठी पुढाकार

१७.१ व्यापार व वाणिज्य यांना पाठबळ देण्यासाठी प्रशासकीय कक्ष

राज्याच्या व्यापार आणि वाणिज्य क्षेत्राचे रोजगार निर्मितीतील तसेच अर्थव्यवस्थेमध्ये योगदानाचे महत्त्व लक्षात घेता, व्यापार व वाणिज्य क्षेत्रास प्रोत्साहन देण्याकरीता उद्योग विभागांतर्गत एक स्वतंत्र कक्ष / कार्यासन तयार केले जाईल तसेच त्याच्या अंमलबजावणीस सहाय्य करण्यासाठी उद्योग संचालनालयामध्ये स्वतंत्र कक्षाची निर्मिती केली जाईल.

### १७.२ जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषदेची स्थापना

जागतिक औद्योगिक गुंतवणूकीला आकर्षित करण्यासाठी, राज्य सरकारने गुंतवणूक प्रोत्साहन आणि सुलभतेसाठी अनेक उपक्रम हाती घेतले आहेत. उद्योजकांना विविध शासकीय यंत्रणांच्या वतीने दिल्या जाणाऱ्या मंजूरी / परवाने एक खिडकीद्वारे मिळवून देण्यासाठी राज्याने एक खिडकी योजना मैत्री अंतर्गत यापूर्वीच स्थापित केली आहे.

जागतिक गुंतवणूकदारांनी गुंतवणूक करण्यास दाखविलेल्या स्वारस्याचा लाभ घेण्यासाठी राज्य शासन मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषदेची स्थापना करेल. राज्यात विविध क्षेत्रांमध्ये गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी ही परिषद जगभरातील उद्योजकांचे मजबूत जाळे तयार करेल. भविष्यात परिषद युनायटेड स्टेट्स, यूरोप, आशिया, मध्य पूर्व आणि आफ्रिका इत्यादी देशांबरोबर द्विपक्षीय संबंध स्थापित करेल.

जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषद राज्यात जागतिक स्तरावरील गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी खालीलप्रमाणे विविध उपक्रम राबविण्यात येतील.

१. जागतिक स्तरावरील लक्ष्य क्षेत्रातील (Target Sector) गुंतवणूकीची संधी ओळखणे आणि त्याची निवड करणे.
२. राज्यात जागतिक गुंतवणूकीला चालना देण्यासाठी औद्योगिकदृष्ट्या समृद्ध देशांशी द्विपक्षीय संबंध स्थापित करणे.
३. राज्यामध्ये जागतिक गुंतवणूक आकर्षित करण्याकरीता स्थानिक आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रोत्साहनात्मक कार्यक्रम आयोजित करणे आणि त्यात सहभागी होणे.

४. जागतिक गुंतवणूकदारांसाठी जी २ जी आणि जी २ बी बैठका आयोजित करणे.
५. भारताबाहेर व्यापार मेळाव्यामध्ये सहभागी होणे आणि रोड शो आयोजित करणे.
६. जागतिक गुंतवणूकदारांसाठी ग्लोबल लीड मॉनिटरिंग, पाठपुरावा आणि हँड होल्डिंग करणे.
७. प्रचारात्मक जाहिरातींद्वारे ब्रँड मॅग्नेटिक महाराष्ट्राचा गुंतवणूकीस अनुकूल स्थान म्हणून विकास करणे.
८. कॉन्स्युलेट जनरलच्या कार्यालयाद्वारे आणि वेगवेगळ्या सरकारी यंत्रणांच्या समन्वयाने देशामध्ये परकीय गुंतवणूकीचा मागोवा घेणे.
९. गुंतवणूकदारांच्या स्वारस्याच्या ऑनलाइन ट्रॅकिंगसाठी वेब-आधारित पोर्टल स्थापन करणे.
१०. जागतिक गुंतवणूक प्रोत्साहन परिषदेचे कार्यालय मैत्री मध्ये असेल.

## १८. निर्यात प्रचालन पुढाकार

महाराष्ट्र २०१७-१८ या आर्थिक वर्षात रू.४.४९ लाख कोटी इतकी निर्यात करून भारतामध्ये प्रथम क्रमांकावर आहे आणि गेल्या दशकात राज्याच्या निर्यातीमधील प्रगतीचा आलेख उंचावत आहे. महाराष्ट्रातील प्रमुख निर्यातींमध्ये रत्ने आणि आभूषणे, अभियांत्रिकी यंत्रसामग्री आणि उपकरणे, औषधोत्पादने, माहिती तंत्रज्ञान, लोह आणि स्टील, वाहने आणि सुटे भाग / उपकरणे, कापूस व इतर कृषी उत्पादनांचा समावेश आहे. निर्यात व्यूहरचना आखण्याकरीता एक अभ्यास अहवाल तयार करण्यात आलेला असून त्यामध्ये वस्त्रे, अभियांत्रिकी वस्तू, कृषी उत्पादन आणि प्रक्रियाकृत खाद्य पदार्थ, आयटी / आयटीईएस, ऑटो व ऑटोचे सुटे भाग आणि औषधे आणि रसायने ही प्रमुख क्षेत्रे निर्यात वाढीसाठी अधोरेखित करण्यात आलेली आहेत.

### १८.१ निर्यात प्रचालन परिषदेची स्थापना

कोणत्याही देशाची आर्थिक कामगिरी ही त्याच्या जागतिक व्यापारातील म्हणजेच निर्यातीवर अवलंबून असते. केंद्र सरकारच्या क्षेत्रीय निर्यात प्रचालन परिषद (सेक्टोरल एक्स्पोर्ट प्रमोशन कॉन्सिल) च्या धर्तीवर राज्य शासनाने मा.मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र निर्यात प्रचालन परिषदेची स्थापना करण्याचे योजिले आहे. ही परिषद निर्याताभिमुख उद्योगांना प्रोत्साहित करेल तसेच स्पर्धात्मकतेबद्दल जागरुकता निर्माण करण्यासाठी आणि निर्यात वाढीस प्रोत्साहन देण्यासाठी एक व्यासपीठ म्हणून कार्य करेल. परिषदेची प्रमुख कार्ये खालीलप्रमाणे असतील.

१. जागतिक आणि स्थानिक भागधारक, सरकारी यंत्रणा आणि आंतरराष्ट्रीय समुदायांसह संवाद.
२. निर्यात प्रचालनासाठी आराखडा तयार करणे.
३. निर्यातक्षम घटकांच्या तक्रारींचे निराकरण करणे व निर्यातीसंबंधी माहिती पुरविणे.

४. निर्यातीसंबंधी बौध्दिक माहिती : जगभरातील निर्याताभिमुख उत्पादने, ब्रॅण्ड आणि सेवांच्या मागणीशी संबंधित बाजार बुद्धिमत्ता, व्यवसाय बुद्धिमत्ता इ. साठी एक विचार मंच म्हणून कार्य करेल.

५. राज्यातील निर्यात वाढविण्यासाठी विपणननाशी संबंधित विविध सहाय्यासाठी ती एक सुविधा संस्था म्हणून काम करेल.

अ) मुद्रा विकसन: देशांतर्गत आणि जागतिक स्तरावर राज्यामधील प्रसिद्ध ब्रॅण्डचा प्रचारात्मक जाहिरातींद्वारे निर्यात उत्पादनांसाठी विकास केला जाईल.

ब) निर्यात जागरूकता: प्रशिक्षण कार्यक्रम, कार्यशाळा, परिसंवाद इ. द्वारे निर्यात क्षमता आणि प्रक्रियेबद्दल जागरूकतेचा प्रसार केला जाईल.

क) प्रदर्शन आयोजित करणे: निर्यात प्रचालन प्रदर्शन, परिसंवाद, कॉन्फरन्स इत्यादी (देशांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय) आयोजित करण्यासाठी निर्यातदार / संस्था/मंडळ / ईपीसी यांना सहाय्य प्रदान करणे.

ड) प्रदर्शनांमध्ये सहभाग: देशांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांमधील सहभागास प्रोत्साहन देण्यासाठी, राज्य शासन प्रदर्शनांमध्ये सहभागी होण्यासाठी आलेल्या खर्चास सहाय्य देईल.

इ) निर्यात उत्पादन विकास: नवीन उत्पादनांना निर्यात आणि नवीन बाजारपेठ मिळवून देण्याकरीता विदेशी ग्राहकांना सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांकडून निर्यात नमुने (सॅम्पल्स) उपलब्ध करून देण्यास प्रोत्साहन दिले जाईल.

फ) उत्कृष्ट निर्यात पुरस्कार: निर्यातदारांना निर्यातीमधील उत्कृष्ट कामगिरी केल्याबद्दल पुरस्कार दिले जातील.

## १८.२ निर्यात पायाभूत सुविधा पाठबळ

१. प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्र: प्रादेशिक निर्यात क्षमतेस समर्थन देण्यासाठी राज्याच्या विविध विभागांमध्ये प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्रे स्थापित केली जातील

२. अंतिम टप्प्यापर्यंत जोडणी: आवश्यक भौतिक आधारभूत संरचना म्हणून अंतिम टप्प्यापर्यंत जोडणी प्रामुख्याने कृषी संबंधित निर्यातीसाठी प्राधान्याने घेतली जाईल.

३. चाचणी आणि गुणवत्ता प्रमाणन प्रयोगशाळा : शासनाने अधोरेखित केलेल्या संबंधित औद्योगिक समूहाजवळ चाचणी आणि गुणवत्ता प्रमाणन प्रयोगशाळेची स्थापना करण्यास राज्य सहाय्य करेल. औरंगाबाद,नागपूर, नाशिक, पुणे, जळगाव, सोलापूर, कोल्हापूर, सांगली आणि रत्नागिरीच्या निर्यातक्षम औद्योगिक समूहांमध्ये समर्पित चाचणी आणि गुणवत्ता प्रमाणन प्रयोगशाळा उभारण्यात येतील. एमआयडीसीद्वारे शक्य तिथे जमीन उपलब्ध करून देण्यात येईल. ५ कोटी रुपयांच्या प्रकल्प मर्यादेसह प्रकल्प खर्चाच्या ५०%

भांडवली खर्च (जमीन वगळता) धोरणाच्या कालावधीत राज्यामधील पहिल्या १२ प्रयोगशाळांना अनुदान सहायता स्वरूपात देण्यात येईल.

४. राज्य शासन योजनांतर्गत योजनांद्वारे अर्थसंल्पीय तरतूदीद्वारे अश्या प्रकल्पांना सहाय्य करेल.

### १८.३ साहस भांडवल निधी (व्हेंचर कॅपिटल फंड)

राज्य साहस भांडवलासाठी सिडबीला निधी उपलब्ध करुन देईल व सदर निधी निर्यातक्षम घटकांना (ईओयू) व्यवहार्यता-तफावत-निधी (व्हायबिलिटी गॅप फंडिंग) म्हणून देण्यात येईल.

## १९. विशेष पुढाकार

प्रादेशिकदृष्ट्या संतुलित आणि सर्वसमावेशक वाढीचा विचार दृष्टीसमोर ठेऊन राज्यात गुंतवणूक आणि रोजगार वाढविण्यासाठी विविध विशेष पुढाकार प्रस्तावित आहेत.

### १९.१ महाराष्ट्राच्या अविकसित जिल्ह्यांमध्ये उद्योगांसाठी विशेष प्रोत्साहने

औद्योगिक विकासात क्षेत्रीय असमानता दूर करण्यासाठी खालील क्षेत्रांना धोरणांतर्गत अतिरिक्त प्रोत्साहने देण्यात येतील.

१. विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि धुळे,

२. विना उद्योग जिल्हे,

३. नक्षलग्रस्त क्षेत्र (महाराष्ट्र शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने जारी केलेल्या १ एप्रिल २०१३ रोजीचा शासन निर्णय क्रमांक: पीएसआय -२०१३ / (सीआर - ५४) /उद्योग-८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे)

४. आकांक्षी जिल्हे (उस्मानाबाद, गडचिरोली, वाशिम आणि नंदुरबार).

या जिल्ह्यात सामुहिक प्रोत्साहन योजना-२०१९ अंतर्गत सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम, मोठ्या व विशाल प्रकल्पांना गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी आणि रोजगार निर्माण करण्यासाठी अतिरिक्त वित्तीय प्रोत्साहने व प्रोत्साहने उपभोगण्यासाठी अधिकचा कालावधी दिला जाईल.

रोजगारावर आधारित मोठ्या आणि विशाल प्रकल्पांसाठी, रोजगार निर्मितीसाठीची किमान मर्यादा इतर भागांपेक्षा कमी असेल.

### १९.२ कृषी व अन्न प्रक्रिया, हरित ऊर्जा / बायो-इंधन आणि उद्योग ४.० मधील उद्योगांसाठी विशेष प्रोत्साहने

कृषी व अन्न प्रक्रिया (द्वितीय व तृतीय प्रक्रिया करणारे घटक आणि उत्पादन आणि प्रक्रिया करणाऱ्या शेतकरी उत्पादक कंपन्या), हरीत ऊर्जा / जैविक इंधन आणि उद्योग ४.० मधील पात्र औद्योगिक उद्योगांना २०% अतिरिक्त आर्थिक प्रोत्साहने देण्यात येतील आणि दोन वर्ष अतिरिक्त पात्रता कालावधी अनुज्ञेय असेल .

## १९.३ अनुसूचित जाती-जमाती व महिला उद्योजकांसाठी विशेष प्रोत्साहने

अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती व महिला उद्योजकांसाठी विकसित केलेल्या अथवा त्यांनी विकसित केलेल्या औद्योगिक वसाहतींना प्राधान्य व अतिरिक्त आर्थिक सहाय्य देण्यात येईल.

नवीन म.औ.वि.महामंडळ क्षेत्रांमध्ये, २०% क्षेत्र सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांसाठी प्रथम प्राधान्याने जमीन वाटप करण्यात येईल. तसेच २०% क्षेत्र अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती व नव बौध्द उद्योजकांसाठी आणि ५% क्षेत्र महिला उद्योजक आणि महिला बचत गटांच्या औद्योगिक घटकांसाठी व ५ % क्षेत्र दिव्यांगासाठी प्रथम प्राधान्याने जमीन वाटप करण्यात येईल. प्राधान्याने जमीन वाटपाची मर्यादा कोणत्याही नवीन औद्योगिक क्षेत्रात या संवंर्गासाठी वाटपाची कमाल क्षेत्रीय मर्यादा २५% इतकी असेल या विषयी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जमीन वाटप नियामावलीत आवश्यक बदल करण्यात येतील.

अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीमधील उद्योजकांसाठी आणि महिला उद्योजकांसाठी उबवन केंद्रे (इन्क्युबेटर) स्थापन करणाऱ्या उद्योजकांना अधिकचे आर्थिक सहाय्य दिले जाईल.

अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती आणि महिला उद्योजकांना आंतरराष्ट्रीय व्यापार मेळाव्यात सहभागी होण्यासाठी आर्थिक सहाय्य दिले जाईल. डॉ.बाबासाहेब आंबेडकर अनुसूचित जाती जमाती उद्योजकता प्रोत्साहन कार्यक्रमाअंतर्गत अनुसूचित जाती/जमाती उद्योजकतेस प्रोत्साहन मिळणेसाठी, त्यांचे उद्योग सुलभतेने स्थापित होणेसाठी व्हेंचर कॅपिटल सुविधा उपलब्ध केलेली आहे.सदर व्हेंचर कॅपिटल सुविधेचा लाभ कार्यरत उद्योगांसमोर नवीन स्थापित होणाऱ्या उद्योगांनाही देण्यात येईल.

## २०. राज्य पातळीवरील उद्योग पुरस्कार

महाराष्ट्र हे भारतातील सर्वात जास्त औद्योगिकीकरण झालेले राज्य असून ते देशाच्या जीडीपीमध्ये १५% योगदान देते. राज्यातील औद्योगिक विकासासाठी विविध उद्योगांनी प्रचंड योगदान दिले आहे यामुळे मोठ्या प्रमाणात रोजगार निर्मिती झाली आहे. त्यांच्या अतुलनीय योगदानास प्रोत्साहन देण्यासाठी राज्यातर्फे दरवर्षी अशा उद्योग / व्यवसायिकांना राज्य पातळीवरील उद्योग पुरस्कार देऊन सन्मानित करण्याचे प्रस्तावित आहे. या पुरस्कारांसाठी नवीन योजना तयार केली जाईल.

सध्या, राज्यातील विविध जिल्ह्यांमध्ये उद्योग दिवस आयोजित केला जातो. सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांना प्रोत्साहित करण्यासाठी जिल्हा पुरस्कार योजना योग्यरित्या पुनर्निर्मित केली जाईल.

## २१. जिल्हा उद्योग केंद्रांचे सक्षमीकरण करणे.

विविध धोरण आणि योजनांवर व्यापक माहिती देण्यासाठी तसेच जिल्हा व्यापार स्तरावर सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे विपणन, व्यापार आणि वाणिज्य, उद्योजकता विकास आणि आजारी असलेल्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांचे पुनरुज्जीवन करण्यास पाठबळ देण्यासाठी जिल्हा उद्योग केंद्रांचे (डीआयसी) सक्षमीकरण करण्यात येईल. पायाभूत सुविधा अद्ययावत करुन, डिजिटलीकरणास प्रोत्साहन देऊन तसेच क्षमतावृध्दी उपक्रम करून जिल्हा उद्योग केंद्रांचे (डीआयसी) सक्षमीकरण करण्यात येईल. आवश्यकतेनुसार जिल्हा उद्योग केंद्रांतर्गत विद्यमान योजनांमध्ये योग्य त्या सुधारणा करण्यात येतील.

## २२. उद्योजकता उत्तेजनासाठी शिखर संस्था

### २२.१ उद्योजकता उत्तेजनासाठी शिखर संस्था

महाराष्ट्रात जागतिक स्तरावरील (स्टेट ऑफ आर्ट) शिखर उद्योजकता विकास संस्था ही मुंबई महानगर क्षेत्रात कळंबोली जि.रायगड येथे महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाच्या जागेवर स्थापन केली जाईल. त्याची मुख्य वैशिष्ट्ये खालील प्रमाणे आहेत.

१. सदरहू संस्था उद्योजकतेला उत्तेजन देणारी राज्यातील शिखर संस्था असेल व ती अन्य उद्योजकता विकास व व्यवस्थापन विकास कार्यक्रमांचे आयोजन करेल तसेच क्षेत्र विशिष्ट (सेक्टर स्पेसिफिक्स) कौशल्य विकास कार्यक्रम, हॅण्ड्स ऑन प्रशिक्षण व नवीन पिढीतील उद्योजकांना प्रोत्साहन देण्यासाठी मार्गदर्शन करेल आणि स्टार्ट-अप्सना प्रोत्साहीत करेल.

२. संस्थेमध्ये किमान २०० प्रशिक्षणार्थ्यांसाठी निवासाची सुविधा करण्यात येईल.

३. संस्था राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय संस्थांसोबत सहकार्य करार करेल आणि डेटा सेंटर, ई-वाचनालय, उबवन केंद्र, प्रदर्शन व विक्री केंद्रे इत्यादीसारख्या महत्वाच्या सुविधासह सुसज्ज असेल.

४. महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ यांच्यामार्फत तसेच तंत्र व उच्च शिक्षण विभाग, सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागांद्वारे या संस्थेवर प्रतिनिधित्व केले जाईल.

५. महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्राच्या (एमसीईडी) विद्यमान रचनेचा वापर या संस्थेसाठी केला जाईल.

६. अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव (उद्योग) च्या देखरेखीखाली ही संस्था स्वायत्त संस्था असेल आणि कार्यकारी परिषद ही विकास आयुक्त (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली असेल.

### २२.२ सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्राची स्थापना

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ आणि महानगरपालिका यासारख्या राज्य / स्थानिक प्राधिकरणांद्वारे प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्रे विकसित केली जात आहेत. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्र विकसित करेल. सुसज्ज प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्राच्या विकासासाठी राज्य सरकार आवश्यक ते सहाय्य देईल.

**२३. सामाजिक दायित्व निधी (कॉर्पोरेट सोशल रिस्पॉन्सिबिलिटी) (सीएसआर) अंतर्गत कामे.**

समाजाच्या प्रती सद्भावना व्यक्त करण्याचा भाग म्हणून, सामुहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत राज्य सरकारकडून प्रोत्साहन मिळवणारे औद्योगिक घटक त्यांच्या कॉर्पोरेट सोशल रिस्पॉन्सिबिलिटी फंडच्या किमान ५०% रक्कम राज्यामध्ये विकास कामासाठी खर्च करतील.

**२४. क्षेत्र विशिष्ट धोरणे**

अ मागील काही वर्षांमध्ये महाराष्ट्राने क्षेत्र विशिष्ट धोरणे तयार / बदल केली असून त्यांना नवीन औद्योगिक धोरणाशी संलग्न करण्यात येईल.

ब उपरोक्तपैकी काहीही असले तरी, राज्य शासनाने राज्याच्या विविध क्षेत्रनिहाय धोरणांतर्गत विशेष तरतुदी केल्या आहेत. ही धोरणे खालीलप्रमाणे आहेत.

१. रेडिमेड गारमेंट निर्मिती ,जेम्स अँड ज्वेलरी , सूक्ष्म इलेक्ट्रॉनिक्स व अभियांत्रिकी घटक याकरिता फ्लॅटेड गाळायुक्त औद्योगिक संकुले धोरण-२०१८

२. फिनटेक धोरण - २०१८

३. महाराष्ट्र काथ्या धोरण - २०१८

४. महाराष्ट्र इलेक्टिकल व्हेईकल प्रोत्साहन धोरण - २०१८

५. महाराष्ट्र लॉजिस्टिक पार्क धोरण - २०१८

६. वस्त्रोद्योग धोरण - २०१८

७. क्लाउड कॉम्प्युटिंग धोरण -२०१८

८. अवकाश आणि संरक्षण क्षेत्र उत्पादन धोरण -२०१८

९. माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण- २०१५

१०. इलेक्ट्रॉनिक्स धोरण- २०१६

११. किरकोळ व्यापार धोरण-२०१६

१२. एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करताना विकासकांना सोई सवलती-२०१८

१३. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर अनुसूचित जाती व जमातीसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना - २०१६

१४. महिला उद्योजकांसाठी विशेष धोरण-२०१७

१५. टेलीकॉम पायाभूत सुविधा धोरण २०१८

क प्रचलित क्षेत्रनिहाय धोरणांमध्ये महाराष्ट्राच्या पुर्वीच्या औद्योगिक धोरणांचा आणि त्याअंतर्गत सवलतींच्या सर्वसामान्य नियमांचा किंवा सामुहिक प्रोत्साहन योजनेतील सवलतींचा संदर्भ आहे. सदर धोरण (महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१९) जाहीर झाल्यावर, अन्यथा विनिर्दिष्ट केलेले असल्याशिवाय, असे संदर्भ हे महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण-२०१९ त्यामधील सवलतींच्या सर्वसामान्य नियम किंवा सवलतींना अनुलक्षून असल्याचे मानण्यात येईल.

ङ विविध धोरणांतर्गत (जसे की, एकात्मिक औद्योगिक क्षेत्र धोरण, इलेक्ट्रॉनिक्स धोरण इत्यादी) पात्र उद्योगांना लागू असलेली मुद्रांक शुल्क सवलत तशीच सुरु राहील.

**२५. धोरणाचे संनियंत्रण व आढावा.**

महाराष्ट्र राज्याचे औद्योगिक धोरण-२०१९ चा परिणामकारक आढावा व अंमलबजावणी होण्यासाठी तसेच आवश्यक स्पष्टीकरण / अर्थउकल करण्यासाठी तसेच त्याच्या अंमलबजावणीतील प्रगतीवर नियंत्रण ठेवण्यासाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती कार्यरत असेल. ही समिती नवीन औद्योगिक धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी व अंमलबजावणीवर संनियंत्रण ठेवण्यासाठी एक प्रकल्प संनियंत्रण समिती स्थापन करण्यात येईल. सदर प्रकल्प संनियंत्रण समिती म्हणून कार्यरत राहील.

**२६. धोरणातील फेरबदलासाठी समिती :-**

महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९ काही शंका/ अडचणी/ संदिग्धता निर्माण झाल्यास, अशा शंका/ अडचणी/ संदिग्धते संदर्भात निर्णय घेण्याचे व औद्योगिक धोरणात आवश्यक ते फेरबदल करण्याचे अधिकार शासन निर्णय क्र. आयडीएल-१००४ / प्र.क्र.३१८ /उद्योग-८, दिनांक २४/१२/२००४ अन्वये गठीत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रिमंडळ उपसमितीस राहतील.

**२७. उद्योग विषयक बाबींचे निर्धारण करण्यासंदर्भात मंत्रीमंडळ उपसमिती** :-

संयुक्त उपक्रमाद्वारे स्थापित विशेष आर्थिक क्षेत्रे (SEZ), केंद्र शासनाचे कर रचनेतील बदल, बाजार पेठेतील प्रतिकुलता इत्यादी कारणांमुळे अडचणीत आली होती. अशा उपक्रमांना सुलभ निर्गमन मार्ग (Exit Policy) करुन देण्यासाठी एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे (IIA) ही संकल्पना सन २०१३ च्या औद्योगिक धोरणात अंतर्भूत करण्यात आली होती. अशा संक्रमणावस्थेतील विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये विकासकानी मोठया प्रमाणावर गुंतवणूक केली आहे व ही गुंतवणूक बऱ्याच कालावधीपासून अडकून पडलेली आहे, ही बाब शासनास ज्ञात आहे. त्यामुळे अशा उपक्रमांना अधिक प्रोत्साहने देण्याचा शासनास निर्धार आहे. सन २०२५ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था १ ट्रिलियन युएस डॉलर पर्यंत नेण्याचे उद्दिष्टपूर्ती करण्यामध्ये "सेवा" क्षेत्राचा हिस्सा लक्षणीय आहे. या बाबी विचारात घेता राज्यशासनाच्या संयुक्त उपक्रमातील जी विशेष आर्थिक क्षेत्रे विना-अधिसूचित झाल्यावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र म्हणून घोषित होतील अशा औद्योगिक क्षेत्रामध्ये सेवा क्षेत्राचा 'प्रोत्साहन रहित' वापर अनुज्ञेय राहील. ज्या सेवा / प्रकल्प इतर प्रशासकीय विभागाच्या शासकीय धोरणात मंजूर करण्यात आलेल्या आहेत केवळ अश्या सेवा / प्रकल्प या औद्योगिक क्षेत्रात घेता येतील. या व्यतिरिक्त इतर सेवा / प्रकल्पाबाबत शा. नि. क्रमांक आयडीएल-१००४/प्र. क्र. ३१८/उद्योग-८, दिनांक २४/१२/२००४ अन्वये गठीत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमिती निर्णय घेईल.

***********

